## परिचय :

कृष्णचंद्र हे उर्दू साहित्यांतील सर्वांत श्रेष्ठ आणि लोकप्रिय कथालेखक आहेत. आणि अवघ्या एकतीसाव्या वर्षी त्यांनीं हें लोकोत्तर यश संपादन केलें आहे. जवळ जवळ गेलीं आठ वर्षें ते लेखन करीत आहेत. लाहोर येथील अमेरिकन मिशनऱ्यांनीं चालविलेल्या फॉर्मन् ख्रिश्चन् कॉलेजमध्यें ते विद्यार्थी होते, तेव्हांपासून गेलीं आठ वर्षें त्यांचें लेखन अखंड चालू आहे. आजपर्यंत त्यांच्या कथांचे सहा संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. शिवाय एक निबंधसंग्रह आणि नाटकसंग्रह त्यांच्या नांवावर जमा आहे. 'शिकस्त' नांवाची पहिली कादंबरी नुकतीच प्रसिद्ध झाली आहे आणि या कादंबरीनेंहि रसिकांच्या मनांत मोठ्या अपेक्षा निर्माण केल्या आहेत. पण मुख्यत: कृष्णचंद्रांची कीर्ति त्यांच्या लघुकथांवर अधिष्ठित आहे. उर्दू भाषेंत आदर्श म्हणून डोळ्यांपुढें ठेवावा असा एकहि कथाकार नव्हता. परदेशी कथालेखकांचें अनुकरण करण्याचा त्यांना तिट-कारा होता. प्रथम भाषाविषयक असे त्यांनी अनेक प्रयोग केले. कांहीं टीकास्पद ठरले. पण या अनुभवांतूनच सोप्या, अर्थवाही भाषेंत उदात्त आणि सखोल विचार व्यक्त करायला ते शिकले आणि आतां स्वत:ची व्यक्तिनिविष्ट अशी भाषाशैली त्यांनीं आत्मसात केली आहे. काश्मीरमध्यें त्यांच्या शैशवाचा आणि नव-तारुण्याचा काळ गेला. स्वाभाविकच काश्मीरची

काव्यमय पार्श्वभूमि घेऊन त्यांनीं आपल्या पहिल्या कथा लिहिल्या. या कथा अद्भुतरम्य आहेत, पण त्या सखोल अनुभवांच्या गाभाऱ्यांतून उमटलेल्या नाहींत. अलीकडच्या त्यांच्या कथांत खास त्यांचीच अशी एक विशिष्ट भाषाशैली तर आहेच, पण त्याबरोबर मनुष्य स्वभावाचा सखोल अभ्यास आणि सर्वव्यापी सामाजिक जीवनाचा अविष्कार त्यांतून प्रतीत होतो. प्रारंभकालांतील त्यांच्या भूतदयावादाचें आणि पददलितांविषयींच्या अस्पष्ट सहानुभूतीचें स्थान आतां समाजजीवनाच्या सूक्ष्म अभ्यासानें घेतलें आहे. मानवाचें भवितव्य घडविणाऱ्या राजकीय आणि आर्थिक पार्श्वभूमीचें दर्शनहि त्यांच्या अलीकडच्या कथांतून प्रामुख्यानें होतें.

भोंवतालच्या सामाजिक जीवनानें प्रस्फुरित झालेल्या कृष्णचंद्रांच्या तेजस्वी प्रतिभेचें मनोज्ञ दर्शन 'अन्नदाता' या त्यांच्या कथेंत उत्कटत्वानें होते. ही कथा प्रसिद्ध झाल्याबरोबर तिनें वाचकांचें लक्ष वेधून घेतलें. बंगालच्या दुष्काळावर आधारलेली ही सामर्थ्यशाली आणि अर्थगर्भ कलाकृति हिंदी साहित्यांत सर्वोत्कृष्ट ठरली आहे. उर्दू कथासाहित्यांत तर या कथेचें स्थान अनन्यसामान्य असें आहे. पुरोगामी वाङ्मयांत या कथेनें एक नवा आदर्श निर्माण केला आहे. या कथेतील क्रांतिकारक अशी निवेदन पद्धति टीकाकारांना मौलिक आणि म्हणून चित्तवेधक वाटली. हिंदी जीवनांतील

एक परमावधीचा प्रक्षोभकारक असा जळता प्रश्न आपल्या कथेसाठीं निवडण्यांत त्यांनीं दाखविलेलें औचित्य कृष्णचंद्राच्या समकालीन लेखकांना हेवा करण्यासारखें वाटलें असल्यास नवल नाहीं. हें झालें टीकाकार लेखकांसंबंधी. पण हजारों सामान्य वाचकांना ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची वाटली याचें कारण ती त्यांच्या अंतःकरणाला जाऊन भिडली. त्यांच्या भोंवतालीं घडणाऱ्या इतिहासांतील पराकाष्ठेची शोककारक आणि क्षोभजनक घटना त्यांनीं इतकी चित्रदर्शी आणि वस्तुस्थिति निदर्शक केली कीं प्रत्येकाला ही गोष्ट आपलीच आहे, असें वाटलें. बंगालमधील सर्व लोकांचें जीवित धोक्यांत आणणारी दुष्काळाची ही भयंकर घटना त्यांनीं अशा एका वैयक्तिक अनुभवांतून चित्रित केली कीं त्यामुळें साऱ्या मानवतेचें दुःख तें माझें दुःख, असें प्रत्येकाला वाटावें, आणि तरीही या दुःखान्त घटनेच्या विदारक पार्श्वभूमीचा त्याला क्षणभरहि विसर पडूं नये. 'अन्नदाता'चें अलौकिक यश या असामान्य निवेदन पद्धतींत आहे.

एकच गोष्ट वेगवेगळ्या तीन दृष्टिकोनांतून सांगण्याचें या कथेंतील नाविन्यपूर्ण तंत्र म्हणजे कांहीं एखाद्या गारुड्याची तारेवरची कसरत नव्हे. या कथेला आवश्यक असा सामाजिक दृष्टिकोन प्राप्त करून देण्यासाठीं या विशिष्ट निवेदन पद्धतीचा अंगिकार या प्रतिभाशाली लेखकाला करावा लागला. या कथेच्या ओळी

ओळींतून जर लेखकाची तळमळ आणि निष्ठा प्रतीत झाली नसती, तर हें तंत्रसुद्धां कुचकामी ठरलें असतें. कृष्णचंद्र वाचकांचें अंतःकरण हलवूं शकतात, याचें कारण त्यांच्या स्वतःच्या अंतःकरणांत ती भावना खोलवर जाऊन रुजलेली असते, हें होय. वैयक्तिक भावनेचा हा सार्वजनिक अविष्कार हृदयंगम आहे. कोणत्याहि कलेचें ध्येय आणि मर्म हेंच आहे.

के. अहमद अब्बास

कृष्णचंद्र नांवाच्या एका अज्ञात लेखकाची 'अन्नदाता' ही कथा कांहीं दिवसांपूर्वी माझ्या वाचनांत आली. तोंपर्यंत कृष्णचंद्र हें नांव माझ्या खिजणतींतहि नव्हतें; के. अहमद अब्बास-सारख्या एका ख्यातनाम आणि चोखंदळ साहित्यिकानें या कथेचा इंग्रजींत अनुवाद केला आणि म्हणूनच मी तो मोठ्या कुतुहलानें वाचला. या एकाच कथेमुळें कृष्णचंद्रांचें स्थान शरच्चंद्रांच्या आसपास आहे, असें माझें मत झालें.

या लहानशा कथेनें माझ्या मनाची एवढी जबरदस्त पकड घेतली कीं तिचा मराठींत अनुवाद करण्याशिवाय मला गत्यंतर उरलें नाहीं. वाचन संपतांक्षणी मी अनुवादाचा निश्चय केला आणि तत्क्षणीं मी भाषांतराच्या निश्चयानें कृतींत रूपांतर करावयास प्रारंभ केला.

आपल्या सुंदर अनुवादाच्या प्रस्तावांत श्री. अब्बास लिहितात: ' इंग्रजींत या कथेचें भाषांतर करण्याची संधि मला लाभली हें मी माझें मोठें भाग्य समजतों. कृष्णचंद्रांच्या मूळ उर्दू लेखनांत जी नादमधुरता आणि अर्थवत्ता आहे, ती कदाचित् या भाषांतरांत यथाप्रमाण प्रतीत होत नसेल. पण आजच्या हिंदुस्थानांतील, भीषण दैन्यवस्थेचें भेसूर चित्र दाखविणाऱ्या या महान् लघुकथेचें अंशमात्र सामर्थ्य मी या भाषांतरांत आणलें असेल, अशी मला आशा आहे.' अब्बास आणि मी पूर्णपणें सहमत आहोंत.

श्री. कृष्णचंद्र- यांनीं आपल्या कथेचा मराठी अनुवाद करण्याची परवानगी मला अविलंब दिली याबद्दल मी कृतज्ञ आहे.

माझे मित्र आणि आप्त चि. वा. प. ( पंडित ) थत्ते यांच्या सहनशील सहकार्याशिवाय हा अनुवाद त्वरीत लिहून होता ना. त्यांच्या परवानगीशिवाय मी फक्त ऋणनिर्देश करीत आहे. वाचकांनीं परस्पर त्यांचे आभार मानावेत.

शिवाजी पार्क. रस्ता ३,
मुंबई : २८

**माधव मनोहर**

# खुलासा आणि आभार

....प्रस्तुत कादंबरीसाठीं सुप्रसिद्ध चित्रकार भाई चित्तप्रसाद यांनीं अर्थगर्भ असे उपरोधचित्र काढलें होते. पण श्री. माधव मनोहर यांच्या गैरहजेरीमुळें तें या पुस्तकावर येऊं शकलें नाहीं—आम्हीं दिलगीर आहोंत.

या कादंबरीच्या मुखपृष्ठाचे चित्रकार श्री. दत्ता परुळेकर यांनीं त्वरित आणि सुंदर चित्र आम्हांस काढून दिलें यासाठीं आम्हीं त्यांचे आभारी आहोंत.

...या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर श्री. माधव मनोहर यांचेच नांव असून मूळ लेखक श्री. कृष्णचंद्र यांचे नांव नाहीं. त्यांचे नांव मुखपृष्ठावर असणें उचित होतें. पण तें आलें नाहीं. आम्हीं त्यांची क्षमा याचितो.

नवयुग छापखान्याचे संचालक श्री. सापळे-मोहित यांनीं आपल्या "रागिणी" मासिकाच्या खास दिवाळी अंकाचें काम असतांना व इतर कामांची गर्दी असतांना-सुद्धां वेळांत वेळ काढून हें पुस्तक सुदर व सुबक स्वरूपांत अल्पावधींत काढून दिलें याबद्दल आम्हीं त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

संपादक

# १

[ एका परदेशच्या वकिलानें आपल्या देशाच्या
मुख्य प्रधानाला लिहिलेलीं पत्रें– ]

‘ मूनशाइन व्हिला ’
कलकत्ता
८ ऑगस्ट १९४३

मी नुकताच कलकत्त्यास येऊन पोहोंचलों. कलकत्ता हें हिंदुस्थानांतलें सर्वांत मोठं शहर आहे, अशी त्याची ख्याति आहे. हौरा पूल हा हिंदुस्थानांतील सर्वांत मोठा पूल आहे. बंगाली लोक हे हिंदुस्थानांतील सर्व लोकांत अधिक बुद्धिमान् आहेत. कलकत्ता युनिव्हर्सिटी ही हिंदुस्थानांतील सर्वांत मोठी युनिव्हर्सिटी आहे. ‘ सोनागच्ची ’मध्यें हिंदुस्थानांतील इतर कोणत्याहि शहरापेक्षां अधिक वेश्या राहातात. कलकत्त्याजवळ

सुंदरबन आहे. वाघाच्या शिकारीसाठीं तें सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. कलकत्ता हें ज्यूटचं जगातील सर्वांत मोठें केंद्र आहे. 'रसगुल्ला' ही कलकत्त्यांतील लोकांची सर्वांत आवडती मिठाई आहे. असें म्हणतात कीं एका वेश्येनं या मिठाईचा शोध लावला. पण त्या काळांत हिंदी कायद्यांत पेटंट घेण्याची सोय नसल्यामुळें दुर्दैवानं तिला पेटंट घेतां आलं नाहीं. अखेरीस म्हातारपणीं तिला दारोदार भीक मागत फिरावं लागलं, आणि उपासमारीनं ती मेली. या खलित्याबरोबरच मी आपल्यासाठीं दोनशें रसगुल्ले पाठवीत आहे. कटलेट्‌बरोबर रसगुल्ला खावा, त्याची रुचि कांहीं और असते...

आपला आज्ञाधारक सेवक

**एफ. बी. उल्लूसन.**

[ सिल्लोरिकाचा कॉन्सल ]

  

कलकत्ता, ९ ऑगस्ट १९४३.

...आपली मधली मुलगी सिमारा–तिची रोज आठवण येते मला. तिला गारुड्याची पुंगी हवी होती. आज रस्त्यांत मला एक गारुडी भेटला. आणि शंभर रुपयाला त्याची सुंदर पुंगी मी विकत घेतली. ही पुंगी भारी हलकी आहे, नाजुक आहे. 'लौकी' नांवाच्या एका भाजीपासून ती तयार करतात. ही पुंगी म्हणजे सारी हाताची करामत आहे. ही पुंगी मी चांगली पॉलिश करून घेतली आणि तिच्यासाठीं एक सुंदर देवदाराची पेटी मुद्दाम बनवून घेतली. आपल्या परवानगीनें आपल्या मधल्या मुलीला मी ही पुंगी भेट म्हणून पाठवीत आहे. सिमाराला ही भेट आवडेल, अशी मला आशा आहे...

आपला आज्ञाधारक सेवक,
**एफ्. बी. उल्लूसन.**
[ सिलोरिकाचा कॉन्सल ]

  

१० ऑगस्ट १९४३.

...आपल्या देशांतल्याप्रमाणें इकडे कलकत्त्यांत रेशनिंग मुळींच नाहीं. अन्नधान्याच्या बाबतींत तर इथं प्रत्येकाला अगदीं पूर्ण स्वातंत्र्य आहे. मॅंडोरिकाच्या कॉन्सलनें काल सगळ्या कॉन्सलसनां मेजवानी दिली. अर्थात् मलाहि आमंत्रण होतंच. तिथं मांसाहाराचे सव्वीस वेगवेगळे प्रकार होते, दोन डझन भाज्या होत्या, अनेक प्रकारची सॅलडस् नि पुडिंग्ज़हि होते. मेवामिठाईचे अनेक प्रकार होते. आणि उंची मद्य होतें. आपल्या देशांत कांदेसुद्धां रेशन् केले आहेत, हे आपल्याला माहित असेलच. पण इकडे कलकत्त्यांत कशाचेंच रेशनिंग नाहीं. या बाबतींत इथले लोक फारच भाग्यवान् आहेत. या मेजवानीच्या वेळीं एक हिंदी इंजीनीअर मला भेटला. त्याचं शिक्षण आपल्या देशांत झालं आहे. संभाषणाच्या ओघांत तो सहज म्हणाला कीं कलकत्त्यांत सध्यां दुष्काळ आहे. हें ऐकल्याबरोबर मॅंडोरिकाच्या कॉन्सलला आपलं हंसूं आवरेना. आणि मग मला पण मोठ्यानं हंसणं भाग पडलं.

खरोखरच सुशिक्षित हिंदी लोक अगदीं अडाणी असतात. पुस्तकी ज्ञानापलिकडे त्यांना कांहीं येत नाहीं. आपल्या स्वतःच्या देशांतल्या स्थितीचं त्यांचं अज्ञान अगाध असतं. वस्तुथिति अशी आहे कीं हिंदुस्थानांतले दोन तृतीयांश लोक धान्यांची व मुलांची निर्मिति करण्यांत रात्रंदिवस गढून गेलेले असतात. म्हणून या देशांत धान्याचा आणि मुलांचा कधींच दुष्काळ नसतो. हें युद्ध सुरू होण्यापूर्वीं कितीतरी धान्य इथून परदेशी निर्यात होत असे. मुलं जरा मोठी झालीं कीं तीं दक्षिण आफ्रिकेंत काम करण्यासाठीं हमाल म्हणून निर्यात होत. मध्यंतरीच्या काळांत ही हमालांची निर्यात बंद झाली, आणि हिंदुस्थानांतील प्रान्तांना स्वराज्य देण्यांत आलं. मला वाटतं हा हिंदी इंजीनीअर भयंकर बंडखोर असला पाहिजे. तो निघून गेल्यावर मी मॅडेरिकाच्या कॉन्सलपाशीं त्याच्याबद्दल बोललों. त्यावर बराच वेळ विचार करून झान झान ट्रीप म्हणाला कीं स्वतःच्या देशावर राज्य करण्याला हिंदी लोक अगदीं नालायक आहेत. मॅडेरिकाच्या कॉन्सलचं हें मत विचारणीय आहे. मॅडेरिकाच्या सरकारचे आंतरराष्ट्रीय

राजकारणांतील स्थान व वजन लक्षांत घेतां मॅडो-रिका सरकारच्या कॉन्सलचं कोणतहि मत विचार-णीय समजायला हवं...

आपला आज्ञाधारक

**एफ्. बी. उल्सन.**

★ ★ ★

१० ऑगस्ट १९४३.

...आज सकाळीं मी बोलपूरला गेलों होतों. तेथें टागोरांचें ' शांतिनिकेतन ' पाहिलें. शांतिनिकेतन ही एक जंगी शाळा आहे. लोक ह्या शाळेला युनिव्हर्सिटि म्हणतात. या युनिव्हर्सिटींत विद्यार्थ्यांना बसण्यासाठीं एकसुद्धां बांक नाहीं; यावरून येथें देण्यांत येणाऱ्या शिक्षणाची आपल्याला चांगली कल्पना येईल. प्रोफेसर व विद्यार्थि कुठेंतरी झाडाखालीं घाणींत बसतात; आणि ते खरोखर कांहीं अभ्यास करतात कीं डोळे मिटून झोंपा काढतात, कोणास ठाऊक. हें पाहिल्यावर मग मी तेथें फार वेळ थांबलों नाहीं. उकाडाहि फार व्हायला लागला होता; आणि वर झाडांवर कावळ्यांची कावकाव

चालली होती. मग मी क्षणार्धांत तेथून काढतां पाय घेतला.

आपला,

**एफ्. बी, उल्लूसन**

  

१२ ऑगस्ट १९४३

आज मी चीनच्या कॉन्सलकडे गेलो होतो. तेथें पुनः दुष्काळाचा विषय निघाला. पण दुष्काळाविषयीं खरी बातमी कांहीं मिळाली नाहीं. आतां बंगाल सरकार या दुष्काळाविषयीं काय खुलासा करील, तें पहावं. आम्ही सगळें सरकारी घोषणेची वाट पहात आहोंत. सरकारी पत्रक निघालं, म्हणजे मी आपल्याला ताबडतोब कळवीनच.

या सरकारी खलित्याबरोबरच मी आपल्यां मधल्या मुलीसाठीं हिंदी पद्धतीचे शूज् पाठविण्याचं धाडस करीत आहे. एक प्रकारच्या हिरव्या सापाच्या कातडीपासून ते केले आहेत. हे हिरवे साप ब्रह्मदेशांत फार आढळतात. ब्रिटिशांनीं ब्रह्मदेश पुनः जिंकून घेतला, म्हणजे या

पादत्राणांचा व्यापार व खप फार मोठ्या प्रमाणावर वाढेल, अशी आशा आहे.

**एफ्. बी. उल्लूसन**

  

१३ ऑगस्ट १९४३.

...आपल्या कॉन्सुलेटसमोर आज दोन बाया मरून पडलेल्या आढळल्या. बाया कसल्या, हाडांचे निर्जीव सांगाडेच होते ते. या बायांना बहुतेक रॅकिटिस झाला असावा. येथें बंगालमध्यें–कदाचित् साऱ्या हिंदुस्थानांत सुद्धां–ही रॅकिटिसची सांथ फार बोकाळली आहे. रॅकिटिस हा एक मोठा चमत्कारिक आणि भयंकर रोग आहे. त्यामुळें रोग्याचं सारें मांस झडून जातं, हातापायाच्या काड्या होतात, पोट पाठीला टेंकतं, शरीरांतील सारी जीवनशक्ति ओसरून जाते, आणि मग साहजिक रोगी दगावतो. आजपर्यंत या महाभयंकर रोगावर कांहीं औषध सांपडलेलं नाहीं. क्विनाइन फुकट वांटतात; पण त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं.

वस्तुस्थिति अशी आहे कीं हे पूर्वेकडचे रोग आपल्या पश्चिमेकडच्या रोगांपेक्षां अगदीं निराळे आहेत. पूर्व आणि पश्चिम यांत यत्किंचितहि साम्य नाहीं, हेंच यावरून सिद्ध होतें.

सिमाराच्या आईचा बासष्टावा वाढदिवस आतांच केव्हांतरी आहे. सिमाराच्या आईला या शुभप्रसंगीं भेट म्हणून बुद्धाचा एक छोटा पुतळा मी पाठवीत आहे. दोन हजार रुपयांना मी तो विकत घेतला. बिंदुसार राजाच्या कारकीर्दीत तो घडवला गेला आणि बनारसच्या प्राचीन पवित्र मठांत तो पूर्वीं होता. आपल्या दिवाणखान्यांतील शोभेच्या वस्तूंत ही बुद्धमूर्ति चांगली भर घालील, अशी मला आशा आहे. अधिकोत्तर विशेष कांहीं नाहीं...

**एफ्. बी. उल्लूसन**

  

अधिकोत्तर विशेष :

आपल्या कॉन्सुलेट समोर दोन बाया मरून पडल्याचं वृत्त मी कळविलंच आहे. या दोन

बायांमधें एक तान्हं मूल पण आतां सांपडलं आहे. आपल्या मेलेल्या आईच्या शुष्क स्तनाशीं तोंड नेऊन दूध पिण्यासाठीं त्याची धडपड चालली होती, मी त्याला हॉस्पिटल्मधें पाठवून दिलं आहे.

उल्लूसन

  

१४ ऑगस्ट १९४३.

...हॉस्पिटलमधें डॉक्टर त्या पोरक्या पोराला घेत नाहींत. अजून तें कॉन्सुलेटमधेंच आहे. आतां त्याचं काय करायचं, हा मोठा प्रश्नच आहे. या बाबत आपल्या आज्ञेची मी वाट पहात आहे. जिथं तें मूल सांपडलं, तिथंच तें मी परत ठेवून द्यावं, असं मॅडोनियाचा कॉन्सल् म्हणतो. पण या बाबत आपल्या सरकारचा सल्ला घेतल्याशिवाय मी कांहींहि करूं शकत नाहीं. या बाबत मी कांहींहि केलं, तरी त्याचे राजकीय परिणाम अगोदर विचारांत घेतले पाहिजेत....

उल्लूसन

  

१६ ऑगस्ट १९४३.

...कॉन्सुलेटसमोर आज आणखी प्रेतं पडलेलीं पाहिलीं. हें सगळे रॅकिटिस्‌चेच बळी आहेत. रॅकिटिस्‌चं वर्णन माझ्या मागच्या एका खलित्यांत मी केल्याचं आपल्याला आठवत असेलच.

त्या प्रेतांमधें आज मी तें मूल हळूंच ठेवून दिलं आणि नंतर पोलिसला फोन करून कॉन्सु-लेट समोरची ती घाण उचलून नेण्यास सांगितलें. आज संध्याकाळपर्यंत ही सारीं प्रेतं हलविलीं जातील, अशी मला आशा आहे.

**उल्लूसन**

* * *

१७ ऑगस्ट १९४३

'स्टेट्‌स्मन' दैनिकाच्या आजच्या अग्रलेखांत कलकत्त्याच्या दुष्काळाचा उल्लेख आहे. गेले कांहीं दिवस भूकबळींची म्हणून कांहीं चित्रें 'स्टेट्‌स्मन' मध्यें येत असत. ही चित्रें खरोखर भूकबळींचीच

होती किंवा काय, याबद्दल आजच निर्णायक मत देणं फार कठीण आहे. चित्रांत दाखवलेले रोगी रॅकिटिसचेच दिसतात.

परदेशांचे इतर कॉन्सलस या बाबत आपले मत आजच देऊं इच्छित नाहींत.

एफ्. बी. यू.



२० ऑगस्ट १९४३

रॅकिटिसच्या रोग्यांना हॉस्पिटलस्‌मधें दाखल करून घेण्याची परवानगी आज सरकारनें दिली आहे. असं म्हणतात कीं एकट्या कलकत्ता शहरांत दररोज दोनशे माणसं या रोगानं मरत आहेत. ही सांथ वणव्यासारखी सगळीकडे पसरत आहे. डॉक्टर्सहि बिचारे तापले आहेत. कारण या रोग्यांवर क्विनाइनचा कांहींच परिणाम होत नाहीं. सारा ब्रिटिश फॉर्माकोपिआ–म्हणजे एरंडेल आणि ॲस्पिरीन–आज निरुपयोगी ठरला आहे. कांहीं

रोग्यांचं रक्त तपासणीसाठीं पाश्चात्य तज्ज्ञाकडे पाठवलं जात आहे. यामुळें एखाद्या तज्ज्ञाची हिंदुस्थानांत आयात होण्याचा संभव निर्माण झाला आहे. एवढंच नव्हे तर एखाद्या रॉयल कमिशनला या प्रश्नाचा सांगोपांग अभ्यास करून चारपांच वर्षांनीं आपला रिपोर्ट सादर करण्यास सांगण्यांत येईल, अशीहि बोलवा आहे.

तात्पर्य, या रोग्यांसाठीं शक्य तें सारं कांहीं केलं जात आहे. मनुष्य याहून जास्त कांहीं करूं शकणार नाहीं. जन्म आणि मृत्यू परमेश्वराच्या हातीं आहेत, असं बायबल म्हणतं.

बंगाली वर्तमानपत्रांनीं तर अगदीं कहर केला आहे. साऱ्या बंगालमधें दुष्काळाचा डोंब उसळला आहे आणि उपासमारीमुळें हजारो लोक प्रत्यहीं मरत आहेत, असं, या बंगाली वृत्तपत्रांचं म्हणणं आहे. पण माझी मोलकरीण म्हणते कीं वर्तमानपत्रांतील सारे लोक थापाडे असतात. आणि माझी मोलकरीण बंगाली आहे. बाजार करायला तीच जाते, आणि स्वयंपाकघरांत लागणाऱ्या सर्व वस्तू तिला बिनतक्रार मिळतात. अर्थातच सर्व

वस्तूंच्या किंमती बेसुमार चढल्या आहेत, हे तर खरंच. पण या युद्धामुळें असं होणं अगदीं अपरिहार्य आहे.

उल्लूसन

  

२५ ऑगस्ट १९४३

राजकारणी पुरुषांनीं या दुष्काळाच्या बातमीचा आज जोरांत इन्कार केला आहे. हिंदी सभासदांचं मताधिक्य असलेल्या बंगाल असेम्ब्लीनें आज असा निर्णय दिला आहे कीं कलकत्ता किंवा बंगालमधले इतर जिल्हे यांचा दुष्काळी भागांत समावेश करतां येणार नाहीं. याचा अर्थ असा कीं आणखी कांहीं दिवस तरी रेशनिंग होणार नाहीं. परदेशांतल्या कॉन्सल्सना यामुळें हर्ष झाला आहे. कारण बंगाल जर 'फॅमिनएरिआ' ठरला असता तर रेशनिंग ताबडतोब सुरू करावं लागलं असतं आणि त्याचा आमच्यावर मोठा गंभीर परिणाम झाला असता.

फ्रेंच कॉन्सल मॉ. जीन् गल् कालच मला सांगत होता कीं कदाचित रेशनिंग लवकरच सुरू होण्याची धास्ती आहे. म्हणून मी दारूच्या बाटल्या अगोदरच मागवून ठेवाव्यात असं त्याचं म्हणणं आहे. चंद्रनगरहून उंची फ्रेंच मद्य मागवण्याचा माझा विचार आहे. हिंदुस्थानांतल्या फ्रेंच वसाहतींत अनेक शतकांपूर्वी गाळलेली उंची दारू मिळते, असे म्हणतात. फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी गाळण्यांत आलेली दारू आजहि तिथें मिळतें. आपणांस हव्या असल्यास या उंची दारूच्या कांहीं बाटल्या नमुन्यादाखल मी आपणांकडे पाठवून देईन...

उल्लूसन

* * *

२८ ऑगस्ट, १९४३.

....काल एक चमत्कारिक घटना घडून आली. नव्या बाजारांतून माझ्या धाकट्या बहिणीसाठीं

मी काल कांहीं खेळणीं आणलीं. या खेळण्यांत एक सुंदर चिनी बाहुली होती. मेरीला तर ती फारच आवडली. त्या बाहुलीची किंमत सहा रुपये होती. ती बाहुली मी घेतली, आणि मेरीला घेऊन मी माझ्या कारजवळ आलों. आम्ही आंत जाऊन बसणार, तेवढ्यांत एक बंगाली बाई माझा कोट धरून तिच्या भाषेंत काहींतरी बडबडायला लागली. तिच्या घाणेरड्या हातांतून मी माझा कोट कसाबसा सोडवला. आम्ही कारमध्यें बसलों आणि मग ती बाई काय म्हणत होती तें मी माझ्या बंगाली शोफरला विचारलं.

मग शोफरचं आणि तिचं बंगालींत संभाषण सुरू झालं. त्याच्याशीं बोलतांना कडेवरच्या लहान मुलीकडे ती वारंवार बघत होती. त्या मुलीचे डोळे काळेभोर होते आणि तिचाहि रंग पिवळसर झाला होता. ती मुलगी मेरीकडे एकसारखी टक लावून पहात होती. त्या चिनी बाहुलीसारखीच दिसत होती ती.

मग ती बंगाली बाई भराभर कांहींतरी बोलली आणि माझ्या शोफरनें पण तिला भराभर कांहीं तरी उत्तरें दिलीं.

"तिला काय हवंय?"—मी चिडून शोफरला विचारलं.

शोफरनं त्या बाईच्या हातांत कांहीं पैसे टाकले आणि त्यानं भरकन गाडी सुरू केली.—"त्या बाईला आपली मुलगी विकायची आहे. त्या मुलीसाठीं ती सबंध एक रुपया, मागत होती."

"एक रुपाया?"—मी आश्चर्यानं विचारलं "निर्जीव चिनी बाहुलीसुद्धां एवढ्या किंमतींत मिळत नाहीं."

"या दिवसांत बंगाली मुली याहून किती तरी कमी किंमतींत मिळतात"—शोफर म्हणाला.

त्याच्या या बोलण्याचं मला मनस्वी आश्चर्य वाटलं

यावरून मला अमेरिकेच्या इतिहासाची आठवण झाली, अमेरिकन लोक अफ्रिकेंतून नीग्रो लोकांची आयात करीत आणि गुलामांच्या बाजारांत त्यांची विक्री करीत. त्या काळांत एखाद्या अगदीं सामान्य नीग्रोलासुद्धां पंचवीस तीस डॉलर्स कमीतकमी द्यावे लागत. खरोखर अमेरिकन लोकांनीं फार मोठी घोडचूक केली! आफ्रिकेऐवजी हिंदुस्थानांतून जर त्यांनीं गुलामांची आयात केली असती, तर

त्यांचा कितीतरी फायदा झाला असता. नीग्रो-लोकांच्या ऐवजी हिंदी लोकाचा व्यापार करून त्यांना कोटयावधि डॉलर्सची बचत करतां आली असती. एका डॉलरला साडेतीन हिंदु मुली! हिंदुस्थानची लोकसंख्या चाळीस कोटी आहे, म्हणजे अमेरिकेनं हिंदुस्थानांतील सर्व लोक अवघ्या आठदहा कोटी डॉलर्सना विकत घेतले असते! या अमेरिकन लोकांना कांहीं अक्कल नाहीं, हेंच खरं. एखादी नवीन युनिव्हर्सिटि काढण्यासाठीं आम्ही आमच्या देशांत याहून कितीतरी अधिक खर्च करतो.

...माझा शोफर आणखी मला म्हणाला कीं सोनागची हल्लीं गुलामांची बाजारपेठ झाली आहे. शेकडों मुलींची तिथं दररोज खरेदी–विक्री चालू असते. आईबाप आपल्या मुली विकतात, वेश्या त्या विकत घेतात. एका मुलीची किंमत साधारणपणें एक रुपया. मुलगी विशेष सुरेख असली तर तिचे तीन चार रुपये सुद्धां येतात. या मीनाबाजारांत तिलोत्तमेची किंमत दहा रुपये आहे. तांदूळ रुपयाला रत्तल मिळतात. एका कुटुंबानं दोन अडीच मुली विकल्या, तर त्या पैशांत त्याला एक आठवडाभर

भात खाऊन सुखानं राहतां येईल, आणि साधारण बंगाली कुटुंबांत दोनापेक्षां अधिक मुली असतात.

उद्यां कलकत्त्याच्या मेयरनं आम्हांला खाना देण्याचें योजलं आहे. मेजवानीच्या वेळीं आणखी कांहीं मनोरंजक माहिती मिळण्याचा संभव आहे....

उल्लूसन.

  

२९ ऑगस्ट, १९४३

...कलकत्त्याच्या मेयरनं सांगितलं कीं बंगालमधें खरोखरच दुष्काळ पडला आहे आणि परिस्थिति उत्तरोत्तर बिकट होत चालली आहे. या दुष्काळांत आपल्या सरकारनं हिंदुस्थानला कांहीं मदत पाठवावी, अशी त्यानं मला विनंति केली आहे. आपल्या सरकारची या दुष्काळांत हिंदुस्थानला पूर्ण सहानुभूति आहे, असं मी त्याला आश्वासन दिलं आहे. पण त्याबरोबरच त्याला आवर्जून सांगितलं आहे कीं, हा दुष्काळ हा

हिंदुस्थानचा अंतर्गत प्रश्न आहे, आणि या प्रश्नाबाबत अधिक कांहीं ढवळाढवळ करण्याची आपल्या सरकारची इच्छा नाहीं. आपण लोकशाहीचे खरेखुरे पुरस्कर्ते आहोंत. हिंदुस्थानां-तल्या लोकांना जगण्याचं किंवा मरण्याचं पूर्ण स्वातंत्र्य आहे आणि या स्वातंत्र्यावर घाला घालण्याची आमची बिलकुल इच्छा नाहीं. हा वैयक्तिक, प्रांतिक किंवा फार फार तर राष्ट्रीय प्रश्न आहे. आंतरराष्ट्रीय नव्हे. ज्ञान ज्ञान ट्रीपनं या संभाषणांत भाग घेतला. मेयरला त्यानं एक मोठा खोंचदार प्रश्न विचारला--"तुमची असेंब्लीच बंगालमध्यें दुष्काळ आहे, हें कबूल करायला तयार नाहीं. मग तुम्ही परदेशी सरकारची मदत कशी मागतां?"--यावर मेयरसाहेब निरुत्तर झाले आणि त्यांनीं भराभर रसगुल्ले खायला सुरवात केली!....

एफ्. बी. यू.

  

३० ऑगस्ट, १९४३

हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी मि. अॅमेरी यांनीं हाउस ऑफ कॉमन्समधें प्रश्नोत्तरांच्यावेळीं सांगितलं कीं हिंदुस्थानांतली लोकसंख्या आणि हिंदुस्थानांतील धान्याचं उत्पादन यांत सध्यां मेळ राहिलेला नाहीं. लोकसंख्येंत अडीच पटीनं वाढ झालेली आहे आणि त्या मानानं त्या प्रमाणांत धान्यांत झालेली नाहीं. शिवाय हिंदी लोक भयंकर खादाड आहेत.

याबाबत माझंहि मत असंच आहे. हे हिंदी लोक दिवसांतून दोनदां किंवा क्वचित एकदांच जेवतात. पण दररोज पांचवेळां जेवणाऱ्या आपल्यासारख्या पाश्चात्यापेक्षां ते अधिक खातात. झानझान ट्रीपचेहि मत असंच आहे. बंगाल्यांतली मृत्युसंख्या अशी अफाट वाढण्याला बंगाली लोकांचा जबरदस्त खादाडपणाच कारणीभूत आहे. ते इतके खातात कीं केव्हां केव्हां पोट फुटून ते मरतात. किंवा पोट फुटलं नाहीं तर त्यांचीं आंतडीं निकामी होतात. हिंदी लोक आणि उंदीर यांच्यांत जननाचं प्रमाण बेसुमार

आहे आणि या दोन जातींत तसा फारसा फरकहि नाहीं. हिंदुस्थानांतील लोक जगांत येतात आणि तितक्याच वेगानं जगांतून जातात. पुष्कळ वेळां जन्म आणि मरण यांत फारसं अंतर नसतं. उंदीर प्लेगनें मरतात तर हिंदी लोक रॅकिटिसनं मरतात– आणि पुष्कळ वेळां प्लेग आणि रॅकिटिस या दोन्ही रोगांना ते बळी पडतात. तें कांहीं कां असेना, जोंपर्यंत उंदीर आपआपल्या बिळांतून रहात आहेत, आणि जागतिक शांततेला बाध आणण्यासारखं वर्तन करीत नाहींत, तोंपर्यंत त्यांच्या अंतर्गत कारभारांत लक्ष घालण्याचं आपल्याला मुळींच कारण नाहीं.....

...हिंदुस्थान सरकारचे अन्नमंत्री बंगालची पाहणी प्रत्यक्ष करण्यासाठीं कलकत्त्यास आले आहेत. आतां बंगाली लोकांना अशी आशा वाटते आहे कीं बंगालमधें खरोखरच दुष्काळ पडला आहे याची जाणीव त्यांना होईल. आणि हें पण त्यांना कळून येईल कीं, मृत्युसंख्या वाढली ती बंगाली लोकांच्या घातपाती कारवायामुळें नव्हे तर उपासमारीनं.......

**उल्लूसन.**

  

२० सप्टेंबर, १९४३

...अन्नमंत्री दिल्लीला परत गेले. नंतर व्हाईसरॉयला ते आपले निवेदन सादर करतील....

एफ्. बी. यू.

  

२५ सप्टेंबर, १९४३

....लंडनच्या वृत्तपत्रांनीं बंगालच्या उपासमारी-बद्दल गहजब चालवला आहे. कलकत्त्याच्या रस्त्यारस्त्यांतून दररोज शेंकडों मुडदे ओढून न्यावे लागत आहेत, असेंहि लंडनचीं वृत्तपत्रें म्हणतात. पण हे केवळ वर्तमानपत्रीं रिपोर्ट आहेत, त्यांत फारसा तथ्यांश नाहीं. बंगालमधें दुष्काळ आहे, अशी अजून सरकारी घोषणा झालेली नाहीं.

...परवांच चिनी कॉन्सल् मला सांगत होता कीं बंगाली लोकांसाठीं चीनमधें रिलीफ फंड गोळा करण्याचा त्याचा विचार आहे. पण तो बिचारा

अगदीं भांबावून गेला आहे. त्याला निश्चित असं कांहींच ठरवतां येत नाहीं. कांहीं लोक म्हणतात कीं बंगालमधें दुष्काळ आहे आणि कांहीं म्हणतात कीं नाहीं. यावर मी त्याला सल्ला दिला कीं बाबारे ! उगाच घाई करूं नकोस. व्यर्थ फशीं पडशील. हिंदी लोकांच्या खादाडपणामुळें अन्न-धान्याचा तुटवडा पडतो आहे, एवढीच सरकारी घोषणा या बाबत झालेली आहे. या खादाड लोकांसाठीं फंड गोळा करावयाचा म्हणजे त्यांच्या खादाडपणाला उत्तेजन देण्यासारखं आहे. ही भूतदयेची वृत्ति अंतीं घातक ठरेल. पण माझ्या या बोलण्यानं चिनी कॉन्सल्चं समाधान झाल्यासारखं दिसलं नाहीं....

उल्लूसन.

* * *

२८ सप्टेंबर, १९४३

. . .अन्नधान्याचा प्रश्न निकालांत काढण्यासाठीं दिल्लींत एक परिषद भरवण्याचं घाटत आहे

दरम्यान दररोज हजारों लोक रॅकिटिसनं मरत आहेत. प्रांतिक सरकारांनीं—बंगाल प्रांतिक सरकारनंसुद्धां—धान्य वाटपाच्या योजनेमुळें कोट्यवधि रुपयांची कमाई केली आहे, अशी बातमी प्रसिद्ध झाली आहे....

एफ्. बी. यू.

★ ★ ★

२० ऑक्टोबर, १९४३.

...काल ग्रँड हॉटेलमधें 'बंगाल दिन' साजरा करण्यांत आला. स्थानिक युरोपियन लोकांशिवाय बडे बडे सरकारी ऑफिसर्स, लक्षाधीश व्यापारी आणि राजे महाराजे या प्रसंगीं उपस्थित होते. कॉकटेल् बार चांगला सुसज्ज आणि समृद्ध होता. उंची मद्याची लयलूट होती. मदाम ज्यूलि-एट ट्रीप बरोबर मी दोनदां नाचलों. तिच्या तोंडाला लसणाचा वास येत होता. तिनं मला सांगितलं कीं या बंगाल दिनाच्या निमित्तानं त्या दिवशीं

नऊ हजार रुपये गोळा झाले. मदाम ट्रीप फार सुंदर आहे. दुर्दैवानं तिचे सारे मित्र हिंदी आहेत आणि म्हणून परदेशी कॉन्सल्स-मध्यें ती फारशी लोकप्रिय नाहीं. खाजगी रीतीनं मला असं कळलं आहे कीं तिच्या या हिंदी मित्रप्रेमामुळें तिच्या नवऱ्याची लवकरच हिंदुस्थानांतून उचलबांगडी होणार आहे. तिथें हजर असलेल्या हिंदी स्त्रियांत स्नेहलता नांवाची एक लावण्यवती अप्सरा होती. तिचं स्वर्गीय नृत्य अजून माझ्या डोळ्यांसमोर नाचतं आहे.

एफ्. बी. यू.

* * *

२६ आक्टोबर, १९४३

....मुंबईच्या एका माजी मंत्र्यानीं आंकडे-वारीनं असं सिद्ध करून दाखविलं आहे कीं बंगालमधें दर आठवड्याला जवळ जवळ एक लाख लोक

मरत आहेत अर्थातच सरकारी आंकडे या आंकड्यांशीं जुळत नाहींत.

कॉन्सुलेटसमोर आज आणखी बरींच प्रेतं अस्ताव्यस्त पडलेलीं दिसलीं. अन्नाच्या शोधांत बारिसालपासून कलकत्त्यापर्यंत शेंकडों मैल पायीं चालत आलेलं एक कुटुंब तिथं मरून पडलेलें आहे, असं माझ्या शोफरचं म्हणणं आहे.

....काल एक विचित्र प्रेत मी पाहिलं—विचित्र म्हणजे असं कीं प्रेताच्या एका हातांत सतार होती. आणि दुसऱ्या हातांत लहान मुलाचा लाकडी खुळखुळा होता. एक वाद्य आणि एक खेळणं! या दोन विचित्र वस्तूंचा मेळ कसा घालावा, हें मला समजत नाहीं. . .

....बंगाली लोक खरोखरच उंदराखारखे आहेत. किती शांतपणानें ते मरतात. हुंदका उसासासुद्धां त्यांच्या ओठांतून कधीं बाहेर पडत नाहीं. अशीं सौम्य, शांत माणसं जगांत दुसरीकडे कुठें नसतील. शांततेचं नोबल प्राइझ जर एखाद्या राष्ट्राला द्यायचं असेल तर तें हिंदुस्थानलाच द्यायला हवं. कोट्यवधि लोकांची उपासमार होत

आहे आणि लक्षावधि लोक दररोज मरत आहेत पण कोणा एकाच्या तोंडून निषेधाचं अवाक्षर कधीं निघेल, तर शपथ. आपले निर्जीव, दृष्टिहीन डोळे आकाशाकडे लावून केविलवाणेपणानं ते बिचारे मरणाची मार्गप्रतिक्षा करीत बसतात. त्यांचं नामस्मरण अखण्ड चाल्लूच असतं, " अन्नदाता ! भगवान् ! अन्नदाता ! "....

...एका हातांत सतार आणि एका हातांत खुळखुळा घेऊन मरणाऱ्या त्या माणसाचे मेलेले, निश्चल, निर्जीव, दृष्टिहीन डोळे काल रात्रभर एकसारखें मला भेडसावीत होते. सबंध रात्रींत एक क्षणभरहि झोंप मिळाली नाहीं.

**उल्लूसन.**

* * *

५ नोव्हेंबर, १९४३

नव्या व्हॉइसरॉय साहेबांची स्वारी काल इथं येऊन दाखल झाली. व्हॉइसरॉय साहेबांनीं बंगाली

जनतेला मदत करण्यासाठीं सैनिकांची योजना केली आहे. उपासमारीच्या रोग्यांसाठीं उपनगरांत तात्पुरतीं वसतिगृहं उभारण्यांत येत आहेत. आतांपर्यंत या बंगाली लोकांना कलकत्त्याच्या रस्त्यांत मरून पडण्याची मोठी वाईट खोड लागली होती. आतां त्यांच्या वसतिगृहांत त्यांच्या सर्व सुखसोयींकडे लक्ष पुरवण्यांत येईल, असं सांगण्यांत येत आहे....

....झान झान ट्रीप कालच मला भेटला. बंगालमधें खरोखरच दुष्काळ पडला असल्याचा संभव आहे, आणि रॅकिटिसच्या सांथीपेक्षां उपास॰मारीचेच ते बळी असावेत, असें त्यानं चक्क बोलून दाखविलं. परदेशी कॉन्सलसमधें या त्याच्या वक्तव्यामुळें मोठी खळबळ उडाली आहे. हेलासिया, रोगेसिया, थियानिका आणि फोलंडचे कॉन्सल्स हें ऐकून गर्भगळित झाले आहेत. आगामी युद्धाची पूर्व सूचना ट्रीपच्या उद्गारांत आहे, असें त्यांना वाटतें.

....युरोपिअन देशांतले जे निर्वासित हिंदु-स्थानांत आहेत, त्यांची व्हाईसरॉय साहेबांच्या

घोषणेमुळें पांचावर धारण बसली आहे. बंगाल-मध्यें दुष्काळ आहे अशी सरकारकडून अधिकृत घोषणा झाली, तर त्यांना मिळणाऱ्या लठ्ठ भत्त्याचें भवितव्य काय, अशी त्यांना आतांपासूनच चिंता लागून राहिली आहे.

व्हाईसरॉय साहेबांच्या या घोषणेमुळें जे अनेक राजकीय प्रश्न उपस्थित होत आहेत, त्यांजकडे मी आपलें लक्ष वेधूं इच्छितों. हिंदुस्थानांतील युरोपिअन निर्वासितांच्या सुखसोयींसाठीं आपण झगडा करायला नको काय? पाश्चात्य संस्कृतीच्या किमान गरजा काय आहेत. स्वातंत्र्याचं आणि लोकशाहीचं संरक्षण करण्यासाठीं आपण काय करायला हवं, असे अनेक गंभीर प्रश्न आज उपस्थित झाले आहेत. याबाबत आपला अमूल्य सल्ला मला त्वरित हवा आहे...'

एफ्. बी. यू.

  

२५ नोव्हेंबर, १९४३

....बंगालमध्यें दुष्काळ मुळींच नाहीं, याबद्दल मॉ. ट्रीपची आतां खात्री पटली आहे. उलट बंगालमधें दुष्काळ आहे, याबद्दल चिनी कॉन्सलच्या मनांत यत्किंचितहि शंका नाहीं. ज्या कामासाठीं कलकत्त्याच्या कॉन्सुलेटमधें मला मुद्दाम पाठविण्यांत आलं होतं, ती कामगिरी माझ्या हातून नीटशी पार पडूं शकली नाहीं, याबद्दल मी दिलगीर आहे. बंगालमध्यें खरोखर दुष्काळ आहे किंवा नाहीं, हें सिद्ध करणारं एकहि प्रमाण माझ्याजवळ नाहीं. तीन महिन्यांच्या अविश्रान्त निरीक्षणानंतरहि या प्रश्नाचं मी निश्चित उत्तर देऊं शकत नाहीं. या माझ्या दुर्बलतेची मला लाज वाटते. मी अपराधी आहे. माझ्या दुर्बलतेची आपण मला उदार अंतःकरणानं क्षमा कराल, अशी मला आशा आहे.

हो ! आणखी एक गोष्ट सांगायची राहूनच गेली. ती कशी सांगावी, हें मला नीटसं समजत नाहीं. आपल्या मधल्या मुलीवर माझं प्रेम बसलं

आहे आणि सिमारा पण माझ्यावर अनुरक्त आहे. अशा परिस्थितींत कलकत्त्याहून मायदेशांत मला परत बोलावणें, हेंच उचित नाहीं काय? तिथं आल्यावर सिमाराशीं लग्न करण्याची आपण मला अनुज्ञा द्यावी आणि नंतर दुसऱ्या एखाद्या मोठ्या कॉन्सुलेटमधें कॉन्सल् जनरल म्हणून आपण माझी नेमणूक करावी, अशी माझी आपणांस नम्र प्रार्थना आहे. आपल्या दयाबुद्धीवर माझी श्रद्धा आहे. माझी हीं मनोवांछितं आपण पुरविलीं, तर मी आपला जन्माचा ऋणी होईन.

या खलित्याबरोबर सिमारासाठीं मी एक रत्नजडित अंगठी पाठवीत आहे, तिचा आपण स्वीकार करावा. सम्राट अशोकाच्या कन्येनं पुरातनकाळीं आपल्या बोटांत घातलेली ही अंगठी सिमाराच्या नाजुक लुसलुशीत बोटांना शोभा देईल यांत संशय नाहीं.

आपला आज्ञाधारक सेवक
एफ्. बी. उल्लूसन्
( सिलोरिकाचा कॉन्सल्. )

# २

नाश्ता करण्यापूर्वीं त्यानं वर्तमानपत्र पाहिलं. मुखपृष्ठावर उपासमारीनं मरणाऱ्या भूक-बळींचीं भेसूर चित्रं होतीं. ते लेकाचे सगळीकडे मरत होते. रस्त्यांतून त्यांच्या प्रेतांचा खच पडला होता. झाडांखालीं, गल्लीबोळांतून, बाजारांत, शेतांत-सगळीकडे प्रेतांची गर्दी झाली होती. लक्षावधि-लोक मरत होते.

आम्लेटवर ताव मारीत असतांना त्याला वाटलं कीं या गरीब बिचाऱ्या मरणाऱ्या लोकांना कांहीं-तरी मदत केली पाहिजे. निराशेच्या पलीकडे गेलेले आणि मृत्यूच्या अंगाईगीताच्या मधुर स्वरांनीं बेभान झालेले ते असंख्य हताश दुःखी जीव— त्यांच्यासाठीं आपण कांहींतरी करायलाच पाहिजे. पण कांहींतरी म्हणजे काय, त्याचा त्याला

नीटसा उमज पडेना. मेलेल्यांना परत जीवदान देणं आणि जीवनांतील निष्ठुर संकटांशीं त्यांना पुनः झगडा करायला लावणं—छे! छे!—हा दुष्ट विचारसुद्धां त्याला दुःसह वाटला. घराभर त्यानं वर्तमानपत्राचीं पानं चाळायला सुरवात केली. एकीकडे टोस्टवर जाम पसरण्याचं त्याचं काम चालूंच होतं. टोस्ट गरम आणि खुसखुशीत होता. कां कोण जाणे, वयांत आलेल्या एखाद्या सुंदर पोरीची त्याला त्यामुळं एकदम आठवण झाली.

आणि एकदम स्नेहलता त्याच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. ती अजून आली नव्हती, पण नास्ता करण्यासाठीं आज त्याच्याकडे येण्याचं तिनं कबूल केलं होतं. गरीब बिचारी! ती अजून साखरझोंपेंत धुंद असेल. किती वाजले बरं?

त्यानं आपल्या सोनेरी रिस्टवॉचला विचारलं. घड्याळाचा रेशमी काळा पट्टा त्याच्या मउमउ, नाजुक, गोऱ्या मनगटावर मोठा खुलून दिसत होता. घड्याळ, कफ्‌बटनस्, टाय्-पिन्-त्याच्या मनांत आलं, पुरुषांचे अलंकार असे हे

एवढेंच. आणि स्त्रिया! सारं शरीर माणिक मोत्यांनीं मढवून काढल्याशिवाय त्यांना चैन पडत नाहीं. कानांत रत्नं, नाकांत रत्नं, डोक्यावर, केसांत, गळ्यांत, मनगटावर, बोटांत, कमरेभोंवतीं, फार काय पायांत आणि पावलांवरसुद्धां रत्नं! आणि पुरुषांना मात्र फक्त तीनच अलंकार वापरण्याची परवानगी! छे! तीन कसले? आतां दोनच. कारण टाय्‌पिन्‌ची फॅशन आतां मागें पडली होती.

या गंभीर प्रश्नावर विचार करतां करतांच त्यानं पॉरिज् खायला सुरवात केली. त्यांतून येणारा वेलदोड्याचा खमंग सुवास चित्ताला धुंद करणारा होता; आणि कां कोण जाणें त्याच्या घ्राणेंद्रियाला दुसऱ्याच अेका मधुर सुगंधाची आठवण झाली.— त्याच्या बरोबर नाचतांना स्नेहलतेच्या तलम साडीवर आणि तिच्या अर्धउघड्या ऊरोजांवर जो सुगंध दरवळत होता, तो आतां त्याच्या स्मृतींत दरवळूं लागला.

कालची धुंद मादक रात्र त्याला आठवली. त्याच्या डोळ्यांसमोर ती रात्र अजूनहि रेंगाळत होती. ग्रँड हॉटेलमधें नृत्याला आवश्यक अश

साऱ्या सुखसोयी उत्कृष्ट होत्या. आपली जोडी काय पण छान जमली होती.—तो आणि स्नेहलता! त्या जनसमर्दांतील प्रत्येकाचे डोळे त्यांच्यावर खिळून राहिले होते. सोनेरी द्राक्षांचे सुंदर घड तिच्या कानांत लोंबत होते, ते तिच्या गालांवर हलतांना मनस्वी आकर्षक दिसत. तिच्या ओंठावर यौवनाची धुंदी आणि मॅक्सफॅक्टरची जादू होती. तिच्या अर्धावृत गौर वक्षस्थलावर मोत्यांची माळ रुळत होती. अंधारांत ती चमकत होती, तळपत होती, मधूनच हलत होती. हलतांना ती एक-सारखी खालीं वर होत होती. तिच्या वर्तुलाकार स्तनावर एखाद्या चपळ सर्पाप्रमाणं ती एकसारखी वेटाळत होती. रंभानृत्यांत तिचा अगदीं हात-खण्डा. तिच्यासारखी नर्तिका त्रिभुवनांत दुसरी कोणी नसेल. रंभानृत्याच्यावेळीं तिच्या अंग प्रत्य-गांची होणारी तालबद्ध हालचाल, पारदर्शक जॉर्जेट साडींतून उठून दिसणारं तिचं उठावदार उन्मादकारक सौंदर्य, तिच्या शरीराबरोबर द्रुतगतीनें हालचाल करणारें तिचं उत्तरीय–चंदेरी रेतीला कुरवाळणाऱ्या चंदेरी लहरीच जशा कांहीं!—हळूं-

हळूं साऱ्या हालचाली निमिषमात्र थांबतात. धुंद स्वरलहरी ओसरतात. हळू, अगदीं हळूं चंदेरी दर्या चंदेरी किनाऱ्याला स्पर्श करतो...स्नेहलतेचे ओंठ अर्धवट विलग झालेले त्याला दिसले. मोत्यांप्रमाणं चमचम करणारें तिचे दांत....आणि मग एकाएकी काळोख झाला. धुंद समाधीमधें डोळे मिटले. ओंठाला ओंठ, छातीला छाती, कमरेला कमर, शरीराला शरीर भिडवून ते दोघे कितीतरी वेळ उन्मनस्कपणं नाचत होते. त्या लाटांची भरती आणि ओहोटी. तें मधुर आणि सुंदर वादळ. इकडून तिकडे, तिकडून इकडे, वर खालीं, खालीं वर होणाऱ्या त्या मनोहर हालचाली....

हळुवारपणानं त्यानं नारिंग कापलं, आणि कांट्यानं बिनचूक एक फोड उचलली. मग त्यानं किटलींतून आणखी एक कपभर, चहा ओतला. त्याच्या मनांतील वादळ अजून शांत झालं नव्हतं. त्याला वाटलं— स्नेहलतेचं शरीर किती सुंदर आहे. तिच्या हालचाली किती आकर्षक आहेत. तिचा स्वभाव किती मोहक आहे. तिची वृत्ति उथळ आहे. तिचं मन किती चंचल आहे...

बुद्धिमान् स्त्रियांचा त्याला तिटकारा होता. समाजवाद, साम्राज्यवाद, मार्क्सवाद; लेनिन, स्टॅलिन ट्रॉट्स्की; स्वातंत्र्य, समता, बंधुता, शिक्षण, नोकरी, अर्थशास्त्र, भौतिकतावाद असल्या अनेक गंभीर विषयांवर चर्चा करण्यांत कालापव्यय करणाऱ्या या बुद्धिमान स्त्रिया त्याच्या चांगल्या परिचयाच्या होत्या. हं! नवीन स्त्री! तिच्यांत स्त्रीत्व आहे म्हणून तिला स्त्री म्हणायचं एवढंच. नाहींतर ती आतां स्त्री राहिलेली नव्हती. कोणत्यातरी तत्त्वज्ञानाची ती एक चालती बोलती पुस्तिका होती. असल्या स्त्रीशीं लग्न करण्यापेक्षां ॲरिस्टॉटल् वाचण्यांत वेळ घालविलेला काय वाईट?

अधीरपणानं त्यानं पुनः घड्याळाकडे पाहिलं. अजून स्नेहलता आली नव्हती. चर्चिल, स्टॅलिन आणि रूझवेल्ट तेहरानमध्यें आज जगाचं भवितव्य घडवीत आहेत. नकाशाला फांसण्यांत येणाऱ्या नव्या रंगांची रंगीत तालीम तेथें चालूं आहे. आणि बंगालमधें लक्षावधि लोक अन्नाच्या अभावीं आक्रोश करीत मरत आहेत. मानवतेला

अटलांटिक चार्टर देण्यांत येत आहे. आणि बंगालमधें तांदुळाचा एक दाणासुद्धां दुर्मिळ झाला आहे. आपल्या मातृभूमीच्या दैन्यामुळं त्याच्या अंःतकरणाला घरं पडलीं. त्याच्या डोळ्यांत नकळत अश्रू उभे राहिले. त्यानं मनांत म्हटलं, आम्हीं गरीब आहोंत. आम्हीं असहाय्य आहोंत. आम्हीं लाचार आहोंत. आमची उपासमार होते आहे. अन्यायाची परमावधि झालेली आहे. क्रौर्याचा अमानुष अतिरेक झाला आहे. मीर कवीच्या घरा-सारखं आमचं घर आहे. त्याच्या घराच्या भिंती ढांसळून पडत होत्या; आणि गळणाऱ्या छपरांतून अश्रुधारा ओसंडत होत्या. मीर कवीला आपल्या घराची ही दैन्यवस्था असह्य झाली आणि तो रडायला लागला.—हिंदभूमी ही सदैव अश्रू ढाळींत असते. कधीं खायला कांहीं नसतं. कधीं ल्यायला कांहीं नसतं. कधीं पावसाचा थेंब पडत नाहीं. कधीं अपरंपार वर्षाव होतो. कधीं सांथ पसरते. कधीं दुष्काळ पडतो. बंगालच्या या हतभागी लोकांकडे पहा. लोक कसले? हाडांचे निर्जीव सांगाडे. त्यांच्या डोळ्यांत चिरनिराशा.

त्यांच्या जिभेवर भिकाऱ्यांचें रडगाणें—भाकरी भाकरी !!

त्या क्षणाला तो चहा त्याला कडू लागला. त्यानं आपल्या मनाशीं कांहीं एक निश्चय केला. आपण आपल्या गरीब देशबांधवांना मदत करूं, आपण फंड जमवूं, आपण हिंदुस्थानभर प्रवास आणि प्रचार करूं आणि आपल्या जोरदार भाषणांनीं जनतेच्या डोळ्यांवरची झांपड दूर करण्याचा यत्न करूं. सभा ! मिरवणुकी ! स्वयंसेवक ! वर्गण्या ! फंड ! विद्युत्प्रवाहाप्रमाणें साऱ्या देशभर आपण नवचैतन्याचे प्रवाह खेळवूं....मधेंच तो चमकला. ठळक, भडक अक्षरांत छापलेलं आपलं नांव त्याला लगेच दिसूं लागलं. प्रत्येक वृत्तपत्रानं त्याच्या देशभक्तीचा गौरव केला होता. आपल्या हातांतील वृत्तपत्रांतसुद्धां आपला फोटो आहे, हें पाहून त्याला समाधान वाटलं. संपूर्ण खादीचा वेष, जवाहरलाल सारखं जाकिट आणि त्यांच्याच सारखं सौम्य पण तेजस्वी हास्य !

बस्स. ठरलं तर मग. टाळी वाजवून त्यानं

वेटरला बोलावलं. आणि आणखी एका आम्लेटची आर्डर दिली.

आजपासून आपल्या आयुष्याला वेगळं वळण लावण्याचा त्यानं निश्चय केला. यापुढील आपल्या जीवनाचा प्रत्येक क्षण आपल्या नागव्या उघड्या हीन दीन देशबांधवांच्या सेवेंत खर्च करण्याचं त्यानं ठरवलं. त्यांच्या सेवेंत आपलं आयुष्य कणाकणानं वंचण्याची त्यानं भीषण प्रतिज्ञा केली. दुसऱ्याच क्षणाला त्याला वाटलं कीं आपल्याला अंधार कोठडींत डांबून ठेवलं आहे. क्षणांत चित्र पालटलं. आपल्याला वधःस्तंभाकडे घेऊन जात आहेत. आपल्या गळ्याभोंवतीं फांस आंवळलेला आहे. आपल्या डोक्यावर आंवळलेल्या काळ्या बुरख्याआडून आपण साऱ्या जगाला आपला अंतिम संदेश देत आहोंत—"मी माझ्या दरिद्री देशबांधवासाठीं हंसत मरणाला मिठी मारतो आहे." हा विचार त्याच्या मनांत आल्यावर त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले आणि चहाच्या कपांत त्यांतले दोन उष्ण खारट थेंब मिसळले. रेशमी हातरुमालानं मोठ्या हळुवारपणानं त्यानं आपले अश्रू पुसले.

तेवढ्यांत एक मोटार पोर्चमध्यें थांबली. त्यानं बाहेर डोकावलें. स्नेहलतेनं मोटारचं दार हळूच उघडलं. हंसत हंसत ती खालीं उतरली आणि भराभर जिना चढून दुसऱ्याच क्षणाला ती त्याच्या खोलींत येऊन उभी राहिली.

“ हेलो ”---ती हंसत म्हणाली. आणि तिनं आपले लुसलुशीत हात त्याच्या गळ्याभोंवतीं आंवळले. त्याच्या गालांना तिच्या सुगंधी ओंठांचा ओझरता स्पर्श झाला. तिच्या त्या हास्यांत प्रकाश होता, आनंद होता, अमृत होतं, अमृत होतं- आणि विषहि, होतं तिच्या डोळयांत विष होतं, तिच्या ओठांत विष होतं. तिच्या लवचिक शरिराच्या हालचालींत विष होतं. तिच्या काळयाभोर केंसांत विष होतं. तिच्या अंग प्रत्यंगांत विष भरलेलं होतं. अजिंठ्यच्या लेण्यांतील चैतन्यमय पण निर्जीव शिल्पाची ती मूर्तिमंत प्रतिमा होती. फक्त तिच्या शरीरावरचे सारे रंग विषमय होते. “ काय चहा घेणार ? ” त्यानं विचारलं.

“ नो थँक्स. आतांच चहा घेऊन आलें मी.” आणि नंतर त्याच्या डोळ्यांतील अश्रूंकडे तिची

नजर वळली आणि तिनं लाडिकपणानं विचारलं " डार्लिंग ! काय झालं तुला ? "

" कुठं काय ? कांहीं नाहीं. हीं चित्रं पहात होतों मी. आपलेच देशबांधव आहेत. निःशक्त, रोगी, उपासमारीनं मरणारे. स्नेहलता ! आपल्याला आपल्या बंगालसाठीं कांहींतरी करायलाच पाहिजे."

" अरेरे ! गरीब बिचारे ! " —असं म्हणून तिनं दीर्घ निश्वास टाकला, आणि आपल्या पर्समधला चिमुकला आरसा काढून लिप्स्टिकनं ती आपले ओंठ रंगवूं लागली.—" त्यांच्यासाठीं आपण काय करणार ? त्यांच्या आत्म्यांना शांति मिळावी म्हणून परमेश्वराची आपण प्रार्थना करणं एवढंच आपल्या हातीं आहे. "

"दॅट्स् इट. यू आर ए जीनिअस, डार्लिंग ! त्याच्या डोक्यांत कांहीं विलक्षण कल्पना आली, "प्रत्येक देवळांतून आणि मशिदींतून या आपल्या दुर्दैवी देशबांधवांसाठीं प्रार्थनेचे जाहीर कार्यक्रम करायला हवेत. वंडरफुल, स्नेहा ! यू आर वंडरफुल्."

" कॉन्व्हेन्टमधें माझं सारं शिक्षण झालं आहे, त्याचा हा परिणाम "—आपल्या सुंदर दंतपंक्तींचं प्रदर्शन करीत स्नेहलता म्हणाली.

त्यानं एक क्षणभर विचार केला.—" आणि आपण—आपण एक--एक ठराव करायला पाहिजे ! "

" ठराव ? कसला ठराव ? "—आपल्या साडीचा पदर सारखा करीत स्नेहलतेनं विचारलं.

" तें मला आतांच नक्की सांगतां येणार नाहीं "--तो म्हणाला,—" पण कुठं एखादा धरणीकंप झाला, केव्हां एखादं अरिष्ट कोसळलं म्हणजे सारे लोक एकत्र जमून कसला तरी ठराव करतात. या ठरावानं आपण आपलं कर्तव्य केल्याचं समाधान लाभतं--तुला कसं वाटतं ?-- मला वाटतं आपण एखाद्या बड्या पुढाऱ्याला फोन करूं. असल्या नाजूक बाबतींत त्याचा सल्ला आपल्या उपयोगी पडेल. "

" काय उगीच बडबड चालविली आहेस रे ? गप्प बैस जरा. आणि असं पहा-" त्याच्याकडे

पाहून मंदस्मित करीत ती म्हणाली,– "हें फूल कसं काय दिसतं माझ्या केसांत?"

त्यानं तिला हळूंच आपल्या जवळ ओढली. आणि तिच्या केसांतल्या नीलराज फुलाच्या मऊ मऊ पाकळया गालांवर घाशीत तिला म्हणाला—– "फारच सुंदर. हा निळा रंग—कृष्ण निळा होता. नागाची फणा निळी असते. आणि विषाचा रंगहि निळा असतो."

मग एक क्षणभर थांबून तो पुनः म्हणाला, "छे! छे! एक ठराव पास करायलाच हवा. एखादा पुढारी आतां गांठलाच पाहिजे. रायबहादुरांना फोन करूं या."

तो टेलीफोनकडे जाण्यासाठीं वळला. पण तेवढ्यांत तिनं त्याला थांबवलं. तिच्या सुकुमार बोटांचा मृदु स्पर्श झाल्याबरोबर त्याच्या शरीरांतील कणन् कण फुलारून उठला. स्तिमित होऊन तो जागच्या जागींच थांबला. त्या सुखद स्पर्शानं त्याला धुंद केलं.

"कालचा डान्स फार सुंदर होता, नाहीं?" —असं तिनं त्याला विचारलं खरं. पण उत्तरा-

साठीं त्याचे ओठ विलग झाले नाहींत, तोच तिनं आपले उष्ण ओठ त्याच्या ओंठावर टेकले. शब्दां-साठीं चाललेली धडपड ओंठांतच अडून राहिली.

पण तिच्या या चिरमधूर चुंबनानं त्याच्या ओंठांना क्षणभर समाधान मिळालं, तरी त्याच्या मनाची तगमग मात्र तिळमात्र थांबली नाहीं. त्याच्या मेंदूंत असंख्य कृमिकीटकांचा बुजबुजाट झाला होता. कणाकणानं ते त्याचा मेंदू कुरतडीत होते. त्याच्या मनांत असंख्य मृतांची प्रेतं थैमान घालीत होती. मनांतून त्यांना उसकावून लावण्याचा त्याचा प्रयत्न निष्फल ठरला होता. पुनः त्यानं तिला धीर करून मघांचाच प्रश्न विचारला,—
“ मग ठराव पास केल्यावर आपण काय करायचं? स्नेहा ! मला वाटतं आपण साऱ्या बंगालमधें दौरा काढावा. आणि उपासमारीनं मरणाऱ्या लोकांच्या मुलाखती घ्याव्यात. तुला कसं वाटतं ?”

“ वेडा आहेस तूं अगदीं. त्यांत इतकं कांहीं मनाला लावून घ्यायला नको. ” भीतीच्या स्वरांत स्नेहलता म्हणाली,—“ अशानं तूं उद्यां आजारीसुद्धां पडशील. त्यांत एवढं मनाला लावून

घेण्यासारखं काय आहे? एवींतेवीं ते बिचारे मरतातच आहेत. मग सुखानं तरी मरूं दे त्यांना. आज इतकें दिवस झाले उंदरासारखे पटापट ते मरताहेत मग आजच तुला त्यांचा एवढा पुळका येण्याचं काय कारण?"

"नाहीं. तुला तें कळायचं नाहीं. दुष्काळी भागांत आपल्याला दौरा काढायलाच हवा. आणि तुला पण माझ्याबरोबर यायलाच हवं. येशील नं स्नेहा?"

"येईन रे! त्यांत काय मोठंस? पण कुठं जाणार आपण?"

"कुठं म्हणजे. जिथं हजारों लोक उपाशी पोटीं मरताहेत, तिथं खेड्यापाड्यांतून.–"

"हात्तिच्या! एवढंच ना. जरुर येईन कीं. पण तिकडे गेल्यावर आपण राहणार कुठं? तिकडे चांगली हॉटेल्स तरी असतील कां?"

हॉटेल्स! त्या एका शब्दानं त्याची ही योजना धुळीस मिळवली. आपल्या मनाच्या एका कोपऱ्यांत आपल्या आवडत्या योजनेला त्यानं मूठमाती दिली. अगोदरच असंख्य ध्येयांचीं थडगीं त्याच्या मनांत

विखुरलेलीं होती. त्यांत आणखी एकाची भर पडली, इतकंच.

एक क्षणभर तो स्वस्थ बसला. जगांतल्या तमाम मोठ्या माणसांवर चिडलेल्या एखाद्या लहान मुलासारखी त्याची अवस्था झाली.

अखेरीस स्नेहलतेनं त्या असह्य शांततेचा भंग केला—" तुझे हे वेडगळ विचार तूं आपल्या डोक्यांतून काढून टाक. मी सांगते आपण आतां काय करूं या तें. ग्रँड हॉटेलमधें आपण एक जंगी जलसा करूं या. जलसा आणि खाना. तिकिटाचा दर पन्नास रुपये. खाद्यपेयांचा खर्च ज्याचा त्यानं करावा. जमलेली सारी रक्कम बेंगॉल रिलीफ फंडाला......"

तो खुर्चीतून ताडकन् उठून उभा राहिला आणि उन्माद भरानं त्यानं तिला अगदीं घट्ट मिठी मारली. "—ओ माय डार्लिंग ! तुझी कल्पना अगदीं झक्क आहे. अगदीं पसंत. एकदम कबूल—तुझं मन फारच हळवं आहे, स्नेहा."

" म्हणून काल रात्रीं तूं मला लग्नाबद्दल विचारलंस वाटतं " स्नेहलतेनं हंसत हंसत

" लग्नाबद्दल ? आणि मी विचारलं ?–बरं पण तूं उत्तर काय दिलंस मग ? "

" उत्तर ! उत्तर काय द्यायचं असल्या खुळ-चट प्रश्नाला ? साफ नकार दिला मी.— " तिनं लचकत मुरडत सांगितलं.

" नक़ार दिलास. ठीक केलंस. "––तो म्हणाला.––" मी तुला विचारलं, त्यावेळीं मी शुद्धीवर नव्हतों. "

★ ★ ★

' मुनीराम जीवनराम. टोबॅकोनिस्ट ' भोंडूमल.–अशी त्या भव्य दुकानावर पाटी होती. तंबा-खूच्या हजार तऱ्हा तेथें होत्या. सिगरेट, सिगार, पाइप, प्लांटर, चिरूट आणि आणखी कितीतरी. राजेशाही दुकान होतं तें. या दुकानासमोरच ग्रँड हॉटेल होतं. ग्रँड हॉटेलची इमारत प्रचंड, भव्य होती—एखाद्या मोंगल थडग्याप्रमाणं ! त्या दुकानाबाहेर ती मोटार उभी राहिली.

" गरिबाला रोटी द्या, माय बाप ! गेला महिनाभर मी उपाशी आहे."––एक नागवा उघडा बंगाली मुलगा रस्त्यावर भीक मागत होता. त्याच्या बरोबर एक लहान मुलगी होती. घाणेरडी

मळकट, गलिच्छ. घाणीनं आणि घामानं त्यांचीं शरीरं बरबटलेलीं होतीं. स्नेहलतेला तें ओंगळ हिडिस दृश्य पाहवेना. तिरस्कारानं तिनं आपली दृष्टी दुसरीकडे वळवली.

"मेम साब! गरिबाला पोटाला द्या—रोटी द्या."—तो मुलगा एक सारखा आक्रोश करीत होता. आणि ती मुलगी निर्लज्जपणानं त्याला साथ करीत होती.

"तुला कोणत्या सिगारेटस् हव्या आहेत, स्नेहा?"—त्यानं तिला विचारलं.

"टर्किश्."–तिनं ऐटींत उत्तर दिलं.

मग तो दुकानांत गेला. स्नेहलता गाडींतच बसून राहिली. तिच्या मनांत तेच ते शब्द एकसारखे गर्दी करूं लागले. मेमसाब!—मेमसाब! मेमसाब!! मेमसाब!!! छे! तिला कांहीं सुचेना. त्या भिकाऱ्यांवर ती जोरांत ओरडली. पुन्हां एकदां ओरडली. पण भुकेला असं सहज हांकलून देतां येत नाहीं. भूक मोठी चिवट असते. ती घाणेरडी मुलगी भीत भीत तिच्याजवळ आली आणि तिच्या पावलांना स्पर्श

करून रडत रडत म्हणाली.— “ मेमसाब ! मेमसाब ! मेमसाब ! ”

संतापानं स्नेहलतेनं आपले पाय बाजूला घेतले. काय करावं आतां या कारट्यांना ? ती अगदीं वैतागून गेली. तेवढयांत तो परत आला. आणि ती म्हणाली,—“ काय भयंकर आहेत हे भिकारी. लोंचट मेले. या भिकाऱ्यांना शहरांतून हांकून लावण्यासाठीं कॉर्पोरेशन एखादा कायदा कां करीत नाहीं ? तूं बरा आपला दुकानांत गेलास. पण या कारट्यांनीं मला इथं अगदीं भंडावून सोडलं. ”

त्यानं त्या कारट्याला एक दमदार थप्पड दिली आणि त्या कारटीच्या घामट झिंज्या धरून तिला दूर भिरकावून दिलें. मग त्यानं स्टार्टरवर पाय दाबला आणि ती गाडी एखाद्या सर्पाप्रमाणं सळसळत ग्रँड हॉटेलच्या पोर्चमधें जाऊन उभी राहिली.

इकडे ती लहान मुलगी मुसमुसून रडायला लागली. अकस्मात् फरशीवर आपटल्यानं तिला चांगलाच मार बसला होता. तो मुलगा आपला

सारा अपमान आणि दुःख गिळून आपल्या बहिणीजवळ गेला आणि तिला हळूंच उठवीत मोठ्या प्रेमळपणानं म्हणाला,—" फार लागलं नाहींना तुला ? ऊठ. अशी रडूं नकोस. "—पण यत्न करूनहि त्या मुलीला आपलं रडं आवरेना. असहायपणें हुंदके देत ती गरीब बिचारी पोर एकसारखी मुसमुसून रडत होती.

* * *

इकडे ग्रँड हॉटेलमधें नाचगाणं अगदीं ऐन रंगांत आलं होतं. नाचून नाचून स्नेहलतेचीं नाजुक पावलं थकून गेलीं होती. म्हणून एक क्षणभर विश्रांति घेत ती बाजूला बसली होती.

" आज किती पैसे गोळा केले आपण ! "— स्नेहलतेनं विचारलं.

" सात हजार पांचशें रुपये."

" पण खरी बहार तर पुढंच आहे. आतांशा कुठं सुरवात झाली आहे. सकाळी चार वाजतां.. "—

" होय. नऊ हजार. कदाचित दहा हजार सुद्धां जमतील तोंपर्यंत."

"पण तुला भारी श्रम पडले, नाहीं ?" तिनं त्याच्या बोटांना हळुवारपणं कुरवाळीत विचारलं.

"तूं काय घेणार ?"

"पण तूं काय घेणार ?"

"जिन् आणि सोडा."

स्नेहलतेनं वेटरला ऑर्डर फर्मावली,–"साहेबांसाठीं जिन् आणि सोडा."

"पण तुला काय हवंय ? शांपेन ? कॉकटेल् ?"

"छे. मला कांहीं नको. मी अगदीं थकून गेलें आहे. एकसारखं नाचायचं आणि प्यायचं. प्यायचं आणि नाचायचं. नाचणं आणि पिणं. पिणं आणि नाचणं. छे. कंटाळा आला बाई अगदीं."

"देशासाठीं असाच त्याग करावा लागतो. असेच असह्य कष्ट सहन करावे लागतात.–" तिचं सांत्वन करण्यासाठीं तो म्हणाला.

" फॅसिझमची मला अशी चीड आहे!–" मोठ्या तळमळीच्या आवेशानें स्नेहलता म्हणाली, —" वेटर, एक कॉकटेल्!"

वेटरनं जिन् आणि कॉकटेल् त्यांच्यासमोर आणून ठेवली. जिन्चा रंग स्नेहलतेच्या ओंठावर फांसलेल्या रंगाशीं स्पर्धा करीत होता. तिनं आपला ग्लास दिव्याच्या उजेडांत ओंठांशीं नेला. एखाद्या तेजस्वी माणकाप्रमाणें त्यांत रक्त-रंग उसळला. तो लाल रंग तिच्या बोटांतल्या अंगठीचा होता.—रक्तासारखा लाल रंग.

मग पुन: त्यांनीं नाचायला सुरवात केली. एक स्वर, एक तान, एकच हालचाल. क्षणार्धांत तीं बाहेरच्या जगाला विसरून गेलीं. समुद्र कुठच्याकुठं दूर राहिला. पृथ्वी–विश्वाच्या वालुका-रण्यांतला हा लहानसा कण पार दिसेनासा झाला. तारका खचित आकाशांतून ते दोघं स्वच्छंद, स्वैर भरारत चालले होते.

स्नेहलतेचे गाल त्याच्या खांद्यावर विसांवले होते; आणि तिच्या केंसातला सूक्ष्म मधुर सुगंध त्याला धुंद करीत होता. तिची केशरचना भारी

आकर्षक होती.—आणि तिची केशभूषा प्रत्येक दिवशीं बदलत असे. इतर तरुण स्त्रिया त्याच त्या कंटाळवाण्या पद्धतीनं शेपटे सोडतात नाहींतर वेण्या घालतात. पण स्नेहलतेची रोज कांहींतरी नवी तऱ्हा असे.

केशरचना हा स्नेहलतेच्या मोठ्या आवडीचा विषय होता. एखादा कलावंत आपल्या कलेशीं तद्रूप होउन जातो, त्याप्रमाणं केशरचना करतांना ती तादात्म्य पावत असे. एक दिवस ती आपले केस कमलबंधांत गुंफी तर दुसऱ्या दिवशीं तेच केस नागफणीचा आकार घेऊन तिच्या कानावर वेटाळून बसत. एखाद्या दिवशीं तिची केशभूषा पाहून चंद्रसूर्याच्या तेजोवलयांची आठवण होई तर दुसऱ्या एखाद्यावेळीं हिमालयांतील दरी शिखरां-प्रमाणें तिच्या केसांची रचना दिसे. आपल्या केंसांवर ती असा कांहीं मनोवेधक, कलात्मक शृंगार-साज चढवी कीं त्याला त्याचं मोठं कौतुक वाटे. तिच्या मोहक, रेशमी केशपाशांत आंवळल्या गेलेल्या त्याच्या मनाला वाटे कीं तिची सारी बुद्धिमत्ता तिच्या केंसांत सांठवली आहे, मेंदूत नाहीं...

नाचरंग ऐन रंगांत आला होता आणि तिचे केस त्याच्या गालांना एकसारखा खोडकर स्पर्श करीत होते. त्याच्या शरीरांतील अणुरेणूंतून त्या नृत्याचा तालबद्ध उन्माद ओसंडत होता. त्यांची विकारवश शरीरं वासनेच्या अग्नींत वितळून एकरूप होऊन गेलीं होतीं. नृत्याच्या त्या स्वर-लहरींत बेताल करणारी तालबद्धता होती. आणि त्यांची शरीरं एखाद्या ज्वालेप्रमाणें तालात नाचत होतीं. ज्वाला ! नाग ! लाटा !...लाटा !.... लाटा !...मधुर अंगाई गीत म्हणत किनाऱ्याचं चुंबन घेणाऱ्या बेफाम संतप्त लाटा...जो जो जो गे ! जो जो जो गे ! मृत्यु हा जीवनाचा आत्मा आहे ! मृत्यु हें चिरंतन तत्त्व आहे. मृत्यु हेंच एक सत्य आहे. बोलूं नका. हलूं नका. विचार करूं नका. कांहींहि करूं नका. झोंप घ्या. स्वस्थ पडून रहा. शांतता हेंच जीवनाचं सत्त्व आहे ! बस्स शांतता. स्वातंत्र्याची चिंता करूं नका ! पारतंत्र्य हेंच जीवनाचं महत्तम तत्त्व आहे ! त्या रंगमंदिरांत सर्वत्र विषमय वातावरण भरून राहिलं होतं... मद्यांत विष होतं...संगीतांत विष होतं...स्त्रीत्वांत

विष होतं....निद्रा आणि विष. आणि स्नेहलतेचे अर्ध विलग ओंठ, तिच्या हातांचा उन्मादकारक विळखा, तिच्या केसांचा धुंद स्पर्श...सर्वत्र विषच विष भिनलेलं होतं....जो जो जो गे! जो जो जो रे!...एकदम अकस्मात दिवे गेले. अंधार झाला. स्नेहलतेच्या ओंठावर त्याचे ओंठ टेकलेले होते. परस्परांच्या बाहुपाशांत ते बांधलेले होते. हळुं हळूं सौम्यपणानं शान्ततेनं त्यांचीं पावलं संगीताला सांथ देत होतीं. इकडून तिकडे, तिकडून इकडे, वरून खालीं, खालून वर. अविनाशी चिरनिद्रेच्या मांडीवर तो स्वस्थ, स्तब्ध झोंपला होता. तो अनंतांत विलीन झाला होता. तो झोंपला होता. तो जिवंत नव्हता. मेला होता!

  

# ३

"...मी मेलों आहे...कां मी जिवंत आहे ?....आकाशाच्या या अमर्याद विस्तारांत माझे दृष्टिहीन निर्जीव डोळे काय शोधीत आहेत ?

कॉन्सुलेटच्या या पायऱ्यांवर एक क्षणभर बसा आणि माझी कहाणी ऐका. तुम्हांला फारवेळ निष्ठत बसावं लागणार नाहीं. पोलिस, सेवासमिति किंवा अंजुमान खुदामल–मुसलमान माझं शरीर पुरण्यासाठीं किंवा जाळण्यासाठीं फरफटत घेउन जातील त्यापूर्वी मला माझी कथा पुरी करायला पाहिजे.

तिरस्कारानं माझ्यापासून असे दूर जाऊं नका. मीहि तुमच्यासारखाच एक मनुष्य आहे––माझ्याहि शरीरांत तुमच्यासारखंच रक्त आहे, मांस आहे,

हाडं आहेत. आतां हें खरं कीं माझ्या शरीरांत रक्तमांसापेक्षां हाडंच अधिक आहेत. माझ्या शरीरांतलीं सारीं जीवनसत्वं सडून चालली आहेत. आणि त्यांचा असह्य दुर्गंध तुम्हाला आतां सहन होण्यासारखा नाहीं. पण असं पहा. जिवंत शरीर असं नासत कुजत चाललं कीं त्यांतून ही अशी दुर्गंधि निर्माण व्हायचीच. शरीरऱ्हासाची ही साधी रासायनिक प्रक्रिया आहे. तुमच्या आणि माझ्या शरीरांत फरक एवढाच आहे कीं माझी हृदयक्रिया आतां बंद पडली आहे. माझा मेंदू आतां काम करीनासा झाला आहे आणि अनेक महिन्यांच्या उपासमारीनं माझं पोट खपाटी गेलं आहे. होय. मी वस्तुतः मेलों असलों तरीसुद्धा इतका भुकेला आहे कीं माझ्या पोटांत धान्याचा एक कण गेला तरीसुद्धां माझं शरीरयंत्र पुन्हा चालायला लागेल. माझ्या सांगण्यावर तुमचा विश्वास बसत नसेल, तर एकदां प्रयोग करून पहा. थांबा...पण तुम्ही चाललांत कुठें ? एक क्षणभर थांबा. जाऊं नका. मी आपली थट्टा करीत होतों. आणि तुम्हाला आपलं वाटलं कीं मेलेलीं प्रेतंसुद्धां आतां अन्नान्न करायला लागलीं

आणि भीतीनं तुमच्या उरांत धडकी भरली. खरं ना ?

दया करा पण. जाऊं नका. माझी कहाणी ऐका. मी आतां धान्याबद्दल जें कांहीं बडबडलों तें सारं विसरून जा. तें तुमचं धान्य तुमच्या मुठींतच अगदीं घट्ट, घट्ट आंवळून धरा. आतां मी तुमच्यापाशीं अन्नाची भिक्षा मागणार नाहीं. कारण माझं शरीर आतां मरणाच्या मार्गावर आहे. त्याला तुमच्या त्या धान्यकणांची आतां बिलकुल जरुरी नाहीं. कांहीं काळानं या माझ्या शरीराचंच धान्यकणांत रूपांतर होईल. हें शरीर मऊमऊ ऊष्ण अशा पृथ्वीगर्भांत मिसळून जाईल. मग त्यांत भाताचीं रोपं मूळ धरतील. एखाद्या प्रसन्न दिवशीं तें रोपटं पाण्याच्या पृष्ठभागांतून हळूच वर येईल आणि आपली नाजुक हिरवीगार काया जगाला दाखवील. वाऱ्याच्या हिंदोळ्यावर झोंके घेत तें हंसेल, नाचेल, खेळेल, चंद्र प्रकाशांत स्नान करील, सूर्य किरणांशीं लपंडाव खेळेल, पक्ष्यांचीं धुंद गाणीं ऐकेल आणि मंद वारा त्याचे मुके घेईल. नंतर त्याच्या अंगप्रत्यंगांतून एक नवं सौंदर्य निर्माण होईल. एका

नव्या गाण्याला सुरवात होईल. नवजीवनानं त्याचा देह फुलून निघेल. धान्यकण ! कोंड्याच्या कडीकपाटांत दडून बसलेला चिमुकला धान्य-कण–शिंपलींतल्या मोत्यासारखा, निर्मळ, निरागस, सुंदर धान्यकण...

आतां नीट लक्षपूर्वक ऐका. तुम्हांला मी मोठं जीवनरहस्य सांगणार आहे. हें जीवनरहस्य अत्यंत महत्वाचं आहे. तें मिळायला आणि कळायला अत्यंत कठीण आहे. कारण हें रहस्य असं आहे कीं जें फक्त मेलेला मनुष्यच सांगू शकतो. गोष्ट फार साधी आहे. त्या दयाघन प्रभूची सतत प्रार्थना करीत रहा कीं यापुढें आपल्याला माणसाचा जन्म कधींहि मिळूं नये, धान्यकणाचा मिळावा. त्याची प्रार्थना करा. तपश्चर्या करा. भीक मागा. पण कसंहि करून त्या ब्रह्मदेवाला संतुष्ट करा आणि त्याच्याकडून एवढं वरदान मागून घ्या कीं देवबाप्पा आम्हांला धान्यकणाचा जन्म दे. मनुष्य प्राण्यांत जें चैतन्य आहे, तेंच धान्यकणांतहि आहे. पण धान्य-कणांतील चैतन्य हें मानव प्राण्यातील चैतन्यापेक्षां कितीतरी शुद्धतर, निरागस, रमणीय, निर्मल आहे.

या कुडीशिवाय माणसाजवळ दुसरं काय आहे ? घरदार, जमीनजुमला, पैसा, कीर्ति, सत्ता, वैभव सारं कांहीं कुडीशिवाय व्यर्थ आहे. पण त्या कुडींत प्राण मात्र हवा हं ! घरदार, जमीनजुमला, पैसा, कीर्ति, सत्ता, वैभव या सर्वांचा तो उपभोग घेतो. आणि ही कुडी मागेंच ठेवून निघून जातो पण त्याच्या अंतःकरणांत कांहीं अस्पष्ट छायाकृति उमटलेल्या असतात. कांहीं सुखद स्मृति असतात. आंगातले धगधगणारे निखारे असतात. एखाद्या मधुर स्मिताची चुकून राहिलेली आठवण असते. हें त्याचं जीवन आहे. यावर तो जगतो आणि तो मेला म्हणजे नेमकं हेंच सारं तो आपल्या बरोबर घेऊन जातो.

कुणीकडे, कसा मी भरकटत चाललोय् पहा. धान्यकणाविषयीं मी तुमच्याजवळ कितीतरी बड-बडलों. धान्यकणाची जीवनकथा मोठी काव्यमय आहे. आतां माझी जीवनकथा ऐका. तिरस्कारानं, त्वेषानं माझ्याकडे पाहूं नका. माझं शरीर मेलं आहे, हें मला माहीत आहे. परंतु अंतरात्मा अजून जागा

आहे. तो अंतरात्मा परमात्म्यांत विलीन होण्यापूर्वी मला माझी गोष्ट संपवायला हवी. जेव्हां कुडी आणि प्राण एकत्र होते, एकत्र हंसत, खेळत, नाचत, गात होते, तेव्हांची ही गोष्ट आहे.

शरीर आणि आत्मा! हे दोघे एक झाले कीं जीवन निर्माण होतं. जीवनांतून आनंद, पराक्रम कर्तृत्व, निर्मिति निर्माण होते. माती आणि पाणी एकत्र भेटतात आणि जीवनदायी धान्याची निर्मिती होते. प्रकृति पुरुष एकत्र भेटतात आणि सुंदर बालक जन्माला येतं. शरीर आणि आत्मा यांचं मीलन म्हणजेच जीवन. या दोघांचीच कथा मी आतां तुम्हांला ऐकवणार आहे–पण ते दोघे आतां दुरावले आहेत. एक नाहींत! शरीर आणि आत्मा–होय. या दोघांत फरक एवढाच कीं शरीर मेलं म्हणजे त्यांतून दुर्गंधाची निर्मिति होते आणि आत्मा मेला कीं फक्त धूरच धूर होऊन जातो. मग या धुरांत तुम्ही काळजीपूर्वक डोकावलांत तर त्यांतून पलीकडे, सदा आनंदी, आशावादी अशा माझ्या गतजीवनांतलं थरथरतं पुसट चित्रं तुम्हांला दिसतील...मधेंच अचानक

ही वीज कुठं चमकली?...हें तिचं हास्य होतं...अशी लाजूं नकोस. ये कीं पुढं ये. भिऊं नकोस....पाहिलींत? हें निष्पाप सौंदर्य, हे लांब सडक काळेभोर केस. हें लाजरं हास्य. भावभरानं ओथंबलेले हे डोळे–हीच ती मुलगी. तीन वर्षांपूर्वीं समुद्रकिनाऱ्यावर मी तिला प्रथम पाहिली. आतपारा हें एक लहानसं खेडेगांव आहे. इतर दहा गांवांसारखं तें एक समुद्रकिनाऱ्यावरचं लहानसं गांव आहे. तिथले बहुतेक लोक मच्छीमारीचा धंदा करतात. तिथं मी तिला प्रथम पाहिली. अजातपूरच्या जमीनदाराच्या मुलीला त्यावेळीं मी सतार शिकवीत असे. आतपाऱ्यामधें माझी एक मावशी रहात असे. तिला भेटण्यासाटीं दोन दिवसांची रजा काढून मी गेलों होतों. या शांत गांवाचा समुद्रकिनाराहि अगदीं शांत आहे. भोंवताली सगळीकडे नारळी पोफळींचीं आणि बांबू सुरूचीं बनं आहेत. कसल्यातरी उदास, खिन्न, अंधुक अशा स्तब्धतेंत तें छोटंसं खेडेगांव दुःखभरानं आपला काळ कंठीत असतं. आमच्या बंगाली खेडेगांवांतून इतकी उदास खिन्नता कां भरून राहिलेली असते, तें मला समजत नाहीं. इथली

सारी जमीन मोठी निष्ठुर, दुःखसंतप्त वाटते. म्हणूनच ही नीरव शांतता तिथं सदैव वास करीत असावी. एकाबाजूला अथांग अमर्याद समुद्राचा विस्तार पसरलेला असतो. बांबूंनी शाकारलेल्या झोंपड्यांतून काळोख असतो.—काळोख आणि ओल आणि खिन्नता. सडणाऱ्या माशांचा दुर्गंध सर्व वातावरणांत भरून राहिलेला असतो. खेडेगांवचं तळं काळसर हिरव्या शेवाळानं झांकून टाकलेलं असतं. तळ्याच्या पाण्यांत एवढी-सुद्धां हालचाल होत नाहीं. भातखाचरांतलं पाणी उथळ आणि स्तब्धगंभीर असतं. आकाशाच्या उरांत भोसकलेल्या तरवारीच्या पात्यांसारखी नारळींचीं उंच उंच झाडं सगळीकडे ताठ उभी असतात. तिथं सर्वत्र, सगळीकडे कसल्यातरी गंभीर निःशब्द दुःखाची छाया सदैव पसरलेली असते.—दुःख आणि स्तब्धता. जरा आणि मरण. आमच्या प्रेमांत, आमच्या गाण्यांत, आमच्या वाङ्मयांत, आमच्या समाजांत आढळणारी ही दुःखाची तीव्र भावना—हें दुःख आमच्या खेड्यांतून निर्माण होतं आणि मग सर्व देशभर पसरतं.

जेव्हा प्रथमच ती माझ्या दृष्टीस पडली तेव्हां

ती मला फारच सुंदर दिसली—एखाद्या अप्सरे-सारखी सुंदर दिसली. ती समुद्रांत पोहत होती. आणि किनाऱ्यावर मी चालत होतों. माझ्या डोक्यांत एका नव्या गाण्याचे सूर घुमत होते. आणि एकदम अचानक कुणीतरी मधुर स्वरांत मला हांक मारली,–"मला पाण्यांतून बाहेर यायचं आहे. जरा पलिकडे जा ना." मी समुद्राच्या दिशेला पाहिलं. सुंदर काळेभोर केस, हंसरा आनंदी चेहरा. दूर क्षितिजाजवळ एका होडीचं पांढरं शुभ्र शीड उन्हांत चांदीप्रमाणं चमचम करीत होतं.

मी विचारलं,–" सातासमुद्रापलीकडून आलीस होय ?"

यावर ती मोकळेपणानं हंसली.–" छे ! मी इथंच राहते. ती पलीकडं होडी आहे ना ? ती माझ्या बाबांची आहे. ते दूर समुद्रांत मासे पकडताहेत. आणि त्यांच्यासाठीं मी न्याहारी घेऊन आलें आहे...कुठं जाताहांत तुम्ही ? तसेच जरा पुढं जा. सरळ. हं. त्या माडाजवळच त्यांची न्याहरी ठेवलेली आहे. आणि माझी साडी पण."

एवढं बोलून ती पाण्यांत दिसेनाशी झाली.

पाण्याच्या पृष्ठभागावर उमटलेले बुडबुडे क्षणभर उन्हांत चमकले. आणि क्षणभरानं किनाऱ्याच्या रोखानं हात मारतांना ती दिसली–" जरा पलीकडे जा ना. असं काय करतां हो अगदीं ?–" ती म्हणाली,–" आणि तेवढी साडी आणून द्या कीं."

" देतों. पण एका अटीवर. "

" अट कसली ? "

" त्या न्याहरींतला अर्धा हिस्सा माझा. मासे आणि भात मी पण खाईन. मला सपाटून भूक लागली आहे. "

ती हंसली आणि तीराप्रमाणं भराभर हात मारायला लागली. एका ठिकाणीं निळ्या पाण्यावर सूर्यकिरणांनीं सोनेरी जाळं विणलं होतं. त्या तेजोवलयांत ती क्षणभर थांबली आणि मग फिरून तिनं हात मारायला सुरवात केली. एखाद्या खोडकर पोरासारखी ती मिस्किलपणानं हंसत होती.

" तुला झालंय तरी काय ? "–मी विचारलं.

" हल्लीं तांदूळ फार महाग झाले आहेत. रुपयाला सारे दोन शेर मिळतात. मी तुम्हाला न्याहरीचा मासळीभात घेऊं देणार नाहीं. "

"मग मी काय खाऊं? मला तर भयंकर भूक लागली आहे."

"कांही खाऊं नका. समुद्राचं खारं पाणी प्या थोडं."

मला वेडावून दाखवीत ती पुन्हां दिसेनाशी झाली.

समुद्राचा ठाव तिला लागला कीं नाहीं, कुणास ठाऊक? पण माझ्या अंतःकरणाचा ठाव मात्र तिनं घेतला!

नववधू म्हणून तिनं गृहप्रवेश केला. तेव्हां तांदुळाचा भाव रुपयाला दोन शेर होता. आणि माझा पगार महिन्याला पन्नास रुपये होता. लग्नापूर्वी भल्या पहाटे उठून मला सारं घरकाम करावं लागे. सैंपाक पण माझा मीच करी. सूर्योदयापूर्वी हें सारं करण्यावांचून मला गत्यंतर नव्हतं. कारण जमीनदाराच्या मुलीची शाळा सकाळीं असते. आणि त्यापूर्वी माझी सतारीची शिकवणी मला संपवावी लागे. संध्याकाळीं पण दोन तास उजळणी करावी लागे. दिवसासुद्धां लहर लागेल तेव्हां जमीनदारबाबू मला बोलावून

घेत आणि सतार वाजवायला सांगत.–" मला आज जरा बरं वाटत नाहीं. "–किंवा–" आज माझं डोकं दुखतं आहे. "–म्हणून

आणि नंतर कांहीं दिवसांनीं या बाळजीवानं या जगांत प्रवेश केला.....ये. अशी जवळ ये. भिऊं नकोस. ते तुला कांहीं करणार नाहींत. त्याना सांग कीं मी अजून लहान आहे. अजून दोन वर्षांची सुद्धां झालें नाहीं. निरपराध आहे. निर्दोष आहे. बाहुली आणि खुळखुळा हीं माझी आवडतीं खेळणीं आहेत. त्यांच्याबरोबर मी तासचे-तास खेळतें. आईचं दूध पिण्यांत मला फार मजा वाटते. तिच्या मऊमऊ मांडीवर पेंगत पडण्या-सारखं दुसरं सुख नाहीं. मी इतकी निर्दोष आहे कीं माझ्याबाजूनं बोलण्याची सुद्धां शक्ति अजून माझ्यांत नाहीं. ज्या आकाशांतून ईश्वरानं मला हें काळोखी घर उजळण्यासाठीं पाठवलं, त्या आकाशाकडे मी एकसारखी टक लावून पहात बसतें....ये. पुढें ये अशी. रडूं नकोस. डोळे पूस बेटा.

हं. तर मी तुम्हांला काय सांगत होतों ? ही पोर जेव्हां माझ्या घरांत आली, तेव्हां तांदूळ

रुपयाला एक शेर झाला होता. पण तरीसुद्धां आम्ही देवाशीं कृतज्ञ होतों. भाताचीं शेतं त्याच्याच कृपेनं जगत वाढत होतीं. जमीनदाराचे उपकारहि कांहीं कमी नव्हते. तो होता, म्हणूनच आम्हांला दोन वेळची भ्रांत नव्हती. शेतांत तांदूळ पिकणं आणि तो माणसाच्या पोटांत जाणं—या दोन क्रियांत जें अंतर आहे, त्यांतच साऱ्या जगाच्या सुधारणेचा, धर्माचा, तत्त्वज्ञानाचा, वाङ्मयाचा, उत्क्रांतीचा आणि संस्कृतीचा इतिहास सांठवला आहे. धान्य पिकवणं आणि तें खाणं...पिकवणं आणि खाणं....दोन साधे शब्द आहेत हे. पण या दोन शब्दांत केवढं अतूट अंतर पडलेलं आहे.

तांदूळ रुपयाला शेर होता.

नंतर रुपयाला पाऊण शेर मिळायला लागला.

नंतर अच्छेर.

नंतर पावशेर.

नंतर अदपाव.

आणि मग हळुंहळुं तांदूळ—तो दिसेनासाच झाला!

तांदुळाचा दाणाहि दृष्टीस पडेना.

मग हळूंहळुं झाडावरचीं सारीं फळं दिसेनाशीं झालीं. भाज्या, मासे, नारळ—कोणताच खाद्य-पदार्थ मिळेनासा झाला. सारा बाजार ओस पडला. लोक म्हणत कीं जमीनदार आणि मारवाडी गबर आहेत. त्यांच्या तळघरांतून धान्याचीं पोतीं शिगोशीग भरुन ठेवलेलीं आहेत. आणि तरीसुद्धां लोक धान्यावांचून उपाशी मरत होते. मूठभर धान्य मिळविण्यासाठीं शक्य ते सारे प्रयत्न केले जात होते. अर्ज विनंत्या, भिक्षा, परमेश्वराची प्रार्थना आणि परमेश्वराची निर्भत्सना. अखेरीस सारे उपाय थकले. सारे लोक हताश झाले. एक देवाच्या नांवाखेरीज कांहीं राहिलं नाहीं. देवाचं नांव—आणि जमीनदाराचं नि मारवाड्यांचं घर.

जमीनदारानं सतारीची शिकवणी बंद केली. लोक उपासमारीनं मरत होते. अशावेळीं गाण्याची काय पत्रास ? सतार शिकण्यासाठीं पन्नास रुपये देणं त्याला परवडेनासं झालं.

भूक, निराशा आणि चिरचिरी मुलगी. मी माझ्या बायकोला म्हणालों,—“ चल. आपण कलकत्याला जाऊं या. तिथं लक्षावधि लोक

राहतात. कदाचित् मला तिथं कांहीं कामधंदा मिळेल. ”

“ कलकत्ता ! ”

“ कलकत्ता ! ”

“ कलकत्ता ! चला आपण कलकत्त्याला जाऊं या ! ”—साऱ्या लोकांच्या तोंडीं हेंच एक पालूपद होतं. समाजाची धारणा ही एखाद्या प्रचंड बंधाऱ्यासारखी असते. कलकत्त्याच्या या हांकाटीनं या बंधाऱ्यांत खिंडारं पडायला सुरवात झाली. आणि थोड्याच दिवसांत एकामागून एक साऱ्या लोकांचा प्रवाह कलकत्त्याच्या दिशेनं वहायला लागला. कलकत्ता ! प्रत्येकाच्या ओंठावर हेंच एक नांव नाचत होतं.— “ कलकत्ता ! कलकत्ता ! ! ”

हजारों लोक याच एका भवितव्याच्या मार्गानं जात होते. कलकत्त्यापासून दूरदूर असणाऱ्या खेडेगांवांतून राहणारे लोक प्रथम हळुंहळूं आणि आणि नंतर भराभर कलकत्त्याच्या दिशेनं वाट-चाल करायला लागले होते. मानवतेचा हा प्रचंड ओघ एकसारखा कलकत्त्याच्या दिशेनं पुढें पुढें

सरकत होता—" कलकत्ता ! कलकत्ता ! " मुंग्या जशा मेलेल्या प्राण्यांच्या शोधार्थ सदैव फिरत असतात, त्याप्रमाणं कलकत्त्याच्या या कलेवराजवळ असंख्य लोकांच्या पाउलवाटा एकत्र होत होत्या...मृत्युमार्ग. मरणाच्या मार्गावर असंख्य यात्रेकरू मोठ्या कष्टानं एकेक पाउल उचलून टाकीत होते. आणि त्यांच्या डोक्यावर गिधाडं भराऱ्या मारीत होती.—लठ्ठ, दुष्ट गिधाडं ! त्यांना आतां अन्नाची वाण नव्हती...प्रेतांच्या दुर्गंधीनं हवा दूषित झाली होती.

शोक करणाऱ्या बायकामुलांच्या अश्रूंमुळें हवा ओलसर झाली होती. प्लेगच्या उंदरांप्रमाणं रस्त्यांच्या कडांकडांना प्रेतांचे खच पडले होते. घारी, गिधाडं, कोल्हे, लांडगे यांची चैन झाली होती. त्यांना दररोज नरमांसाची मेजवानी मिळत होती. हा मनुष्यप्रवाह अखंड होता. अमर्याद होता. बंगालच्या साऱ्या भागांतून हा प्रवाह कलकत्त्याच्या दिशेनं एकसारखा, हळुंहळूं पुढें पुढें चालला होता. या सर्व भुकेकंगालांना कलकत्त्याशिवाय दुसरं कांहीं दिसत नव्हतं—कलकत्ता ! कलकत्ता !!

अशा स्थितींत कोण कोणाला मदत करणार ? आणि कशी करणार ? आत्मसंरक्षणाच्या मूलभूत, पाशवी, उन्मत्त भावनेनं ते सारे भारलेले होते. भूक, निराशा, मरण ! जड पावलांनी आपलीं कृश जखमी शरीरं फरफटत, ओढीत, आपआपसांत भांडत, उसासत आणि रडत, रक्त ओकीत आणि मरत ही स्मशानयात्रा अखंड चालू होती. मुंग्यांसारखे ते सारखे उद्दिष्ट दिशेनं वाटचाल करीत होते. पण त्यांच्यांत मुंग्यांची शिस्त आणि धैर्य नव्हतं. मुंग्या आणि उंदीर सुद्धां अशा भयंकर रीतीनं मरत नसतील...

वाटेंत कुठंतरी, कुणीतरी त्या मरत्या जीवांना चार तुकडे देई, भिक्षा घाली. पण केवळ उदार भावनेनें कोणतेच प्रश्न सुटत नसतात. आणि उदारपण जीवन देऊं शकत नाहीं. घेणारा आणि देणारा दोघांचीहि फसगत मात्र होते.

मधून मधून आम्हांला पण भिक्षा मिळे— एक दिवस सबंध नारळ मिळाला. तान्ही मुलगी दुधासाठीं व्याकुळ झाली होती. कितीतरी दिवसांत तिला आईचं दुध मिळालं नव्हतं. अवर्षणानं

सुकुन गेलेल्या धरित्रीसारखे तिच्या आईचें स्तन निरुपयोगी झाले होते. तिचं सारं शरीर सुकलेल्या फुलासारखं निर्माल्य झालं होतं. त्या बाळजीवाला शांत करण्यासाठीं ती त्याच्या हातांत खुळखुळा देई. त्या पोरीला पण त्या लाकडी खुळखुळ्याचा छंद जडला होता. तासन् तास ती तो खुळखुळा आपल्या चिमुकल्या मुठींत घट धरून ठेवी. त्यादिवशीं सुद्धां तो खुळखुळा तिच्या हातांत होता आणि आपल्या आईच्या कडेवर बसून ती दीनपणानं रडत होती. एखादं भ्यालेलं जखमी हरीण मरणापर्यंत जसं एकसारखं कण्हत आणि ओरडत राहतं, त्याप्रमाणं तिची तगमग चालली होती...पण मी काय सांगत होतों ? त्यादिवशीं आम्हांला एक संबध नारळ मिळाला. नारळाचं दूध आम्ही मुलीला दिलं आणि खोबरं स्वतः खाल्लं. त्यामुळं एक क्षणभर इतकी उभारी वाटली कीं पुनर्जन्म झाल्याप्रमाणं सारं जग क्षणभर टवटवीत दिसायला लागलं.

"कलकत्ता ! कलकत्ता ! !"–आम्ही अजूनहि कधीं न संपणाऱ्या अशा लांबलचक कंटाळवाण्या रस्त्यावरून प्रवास करीत होतों. आतां कोणाजवळ

कांहींहि नव्हतं, त्या सगळ्यांचा निकाल झाला होता. जें विकण्यासारखं होतं, तें विकून टाकलं होतं. फक्त शरीरं तेवढी विकायचीं राहिलीं होतीं. उत्तर हिंदुस्थानांतून शरीरांचीं गिऱ्हाइकं पण आलेलीं होतीं. त्यामध्यें अनाथालयाचे व्यवस्थापक होते. ते विधवांचा आणि निराश्रित अर्भकांचा शोध घेत होते. आपल्या मुलांना अनाथ करण्यासाठीं सारे आईबाप उत्सुक झाले होते. दारिद्र्यानं अर्भकं अनाथ होतात. त्यांचे आईबाप जिवंत आहेत किंवा नाहींत, हा प्रश्न गौण ठरतो. या गिऱ्हाइकांमध्यें रक्तमांसाचे खरेखुरे व्यापारी पण होते. नैतिक, धार्मिक, सामाजिक कसलीहि लाज किंवा चाड त्यांच्यापाशीं नव्हती. यात्रेच्या बाजारांत बकऱ्या किंवा गुरं शेतकरी विकत घेतात. त्याप्रमाणंच तेहि मुली शोधून काढीत होते. त्यांची निवड करीत होते, निवड होईल त्यांची किंमत रोख देत होते.

“ माल आहे. ”

चांगली गोरी दिसते आहे ही पोरगी.

“ जरा काळी आहे नाहीं ? ”

" फारच लुकडी आहे ही. "

" हिच्या तोंडावर तर देवीचे वण आहेत. "

" छे: क्षयी आहे ही. "

" चालेल ! चालेल ! "

" रुपया, दोन रुपये, पांच रुपये, दहा रुपये. "

नवरे आपल्या बायकांचे लिलांव करीत होते. आया आपल्या मुलींना विकीत होत्या. भाऊ बहिणींना विकीत होते. दुष्काळ पडण्यापूर्वी याच लोकानीं या हलकट व्यापाऱ्यांचा आणि त्यांच्या दलालांचा खून पाडला असता. आपल्या मुलांबाळांची अशी वासलात लावण्याचा नुसता ओझरता विचार जरी कुणी बोलून दाखविला असता, तरी तो मनुष्य या लोकांच्या हातीं सुरक्षित राहिला नसता. पण आज तेच लोक आपल्या घरांतल्या मुलीबहिणी विकीत होते. विकत होते एवढेंच नाहीं, तर व्यापाऱ्यांप्रमाणें आपल्या मालाचं ओरडून गुणवर्णन करीत होते. गिऱ्हाइकांची खुशामत करीत होते. एकेका पैशासाठीं घासाघीस करीत होते. धर्म, नीति, प्रीति, मातृत्व,–मानवतेच्या या मूलभूत निष्ठा

आणि भावना आज उघड्या पडल्या होत्या. त्याहि बिचाऱ्या अनाथ झाल्या होत्या. जगांत प्रथम जन्माला आला, तेव्हांच्या मानवाचं जीवन आज त्याचे वंशज जगत होते. भूक, रक्तपिपासा, क्रौर्य यांचा एकच लोळा गोळा होऊन ही मानवजात निर्माण झालेली होती. जंगलांतल्या क्रूर श्वापदांप्रमाणें ते एकमेकांच्या रक्तमांसावर जगत होते.

एक दिवस माझी बायको असहाय्य निराशेनं म्हणाली,—" आपण आपली मुलगी विकूं या. "

लज्जेनं, भयानं, कातरतेनं मान खालीं घालून तिनं हे शब्द कसेबसे उच्चारले. आणि लगेच ती स्तब्ध झाली. डोळ्यांच्या कोपऱ्यांतून तिनं माझ्याकडे पाहिलं. तिच्या विदारक शब्दांचा माझ्यावर काय परिणाम झाला, हें ती अजमावून पहात होती. तिच्या डोळयांत अपराधाची भावना होती. जसा कांहीं तिनं आपल्या मुलीचा खून केला होता, जशी कांहीं नवऱ्याला उघडं करून त्याच्या पाठीवर ती आसुडाचे फटके मारीत होती, जसा कांहीं आपल्या कृश मानेभोंवती

तिनंच फांस आंवळला होता; असा कांहींतरी घोर अक्षम्य अपराध आपल्या हातून घडला आहे, अशा भावनेनं तिनं आपले डोळे जमिनीकडे वळवले होते.

ती मेली, याचं मला आतां दुःख होत नाहीं. ती ते कठोर शब्द बोलली, त्याचवेळीं तिचा प्राण कुडींतून निघून गेला होता. किंबहुना हे शब्द उच्चारण्यापूर्वींच ती मेली होती पण अगदीं आजसुद्धां—म्हणजे माझ्या मरणानंतर सुद्धां—तिच्या ओंठांतून या क्रूर शब्दांचा उच्चार कसा झाला, हें अजूनहि मला कळलेलं नाहीं. हें असं कसं झालं? कसं घडलं? कसल्या निष्ठुर पाशवी भावनेच्या आधीन होऊन तिनं आपल्या मातृत्त्वाचा गळा दाबला? तिनं कसं आपलं मन मारलं? शरीराची आणि आत्म्याची ताटातूट सहजीं कशी झाली? अजूनहि मला हें आठवलं कीं माझ्या अंगावर कसे शहारे उभे राहतात. तिच्या हातांतून मी माझी मुलगी हिसकावून घेतली आणि मग कितीतरी वेळ तिच्याकडे संतापभरानं पहात बसलों. पण माझ्या संतापाची किंवा रागरोषाची

तिला आतां जणूंकाय पर्वाच नव्हती. रडत खडत, खुरडत, यंत्रासारखी पायांची हालचाल करीत आंधळ्यासारखी ती माझ्या मागोमाग येत होती. तिच्या जटा धुळीनं माखलेल्या होत्या. तिच्या वस्त्राच्या चिंध्या झाल्या होत्या. तिच्या पावलावरची जखम एकसारखी वहात होती. आणि तिचे डोळे...तीन वर्षांपूर्वी पाहिलेली ती स्वर्गीय अप्सरा आतां कुठं होती? जललहरींवर स्वैर विहार करणारी ती सुंदर जलदेवता...ताज-महालचं सौंदर्य, कैलास लेण्याची उदात्तता, अशोकच्या विजयस्तंभांची अमरता....सौंदर्य, उदात्तता आणि अमरता यांचा मधुर संगम तिच्या लोकोत्तर सौंदर्यांत त्यावेळीं एक-वटलेला होता. तें सौंदर्य, ती उदात्तता, ती अमरता आज मरण पावलेली होती! ती सौंदर्यशालिनी आज कुठं होती? तें कौमार्याचं सौंदर्य, ती मातृत्वाची उदात्तता, ती स्त्रीत्वाची अमरता धुळीनं माखलेल्या एखाद्या विद्रूप प्रताप्रमांणे आज घाणींत लोळत पडली होती. स्त्री हें एक कोडं आहे, स्त्री ही एक शक्ति आहे,

मूर्तिमंत श्रद्धा म्हणजे स्त्री, जीवितांतील सारभूत सत्य म्हणजे स्त्री, असं म्हणतात. हें जर खरं असेल, तर हें कोडं, ही शक्ति, ही श्रद्धा, हें सत्य तांदुळाच्या एका कणांतून जन्माला येतं आणि त्या कणाशिवाय मरण पावतं !

त्या अप्सरेनं माझ्या मांडीवर आपला देह ठेवला. ती जलदेवता आतां घाणीनं बरबटलेली होती. रस्त्याच्या एका कडेला तिनं प्राण सोडला. चार दोन हुंदके, उसासे मोठ्या कष्टानं तिच्या कंठांतून गळ्यांतून बाहेर पडले आणि क्षणार्धांत तिचं निर्जीव कलेवर माझ्या मांडीवर पडलेलं मला दिसलं. पिंजऱ्यांतून पांखरूं उडून गेलं होतं. आत्म्यानं शरीराचा निरोप घेतला होता.

कां आणि कसं, हें मला आतां सांगतां येणार नाहीं. पण त्यावेळेला कांहीं अबोध स्मृतींनीं माझं मन एकदम भरून गेलं. एका क्षणांत मी अनेक वर्षांपाठीमागं गेलों. मी जिवंत होतों, जगत होतों, तेव्हांचा काळ मला आठवला आणि मग एकदम अचानक मला त्या दिवसाची आठवण झाली. त्या दिवशीं पहिल्यांदाच तिला जवळ ओढून मी तिचं चुंबन घेतलं होतं आणि तिच्या शरीराच्या सुगंधानं मला जाईच्या फुलांची आठवण करून

दिली होती. तिच्या मृत्यूच्या क्षणीं पुन्हां एकदां तो सुगंध माझ्या अंतरांत दरवळला आणि माझे डोळे भरून आले तिच्या निर्जीव ओठांकडे मी वेड्यासारखा पहात राहिलों. माझी आंसवं तिच्या केसावर, गालांवर डोळ्यांवर सारखीं पडत होतीं. माझ्या मांडीवर ती भरून पडली होती—त्या जलदेवतेला अठराव्या वर्षींच मरण आलं होतं. ती अप्सरा आज भुकेली, तहानेली, घाणेरडी, कुरूप होती. त्या अप्सरेचं रूप आज एखाद्या चेटकीसारखं दिसत होतं. मी तक्रार करीत नाहीं. मला कुणाला दोष द्यायचा नाहीं. मरणाबद्दल मला कांहीं म्हणायचं नाहीं. देवाला बोल लावायचा नाहीं. जीवन हें असं कां ?—असा कुणाला जाब विचारायचा नाहीं किंवा रस्त्यानं अखंड चालणाऱ्या त्या आंधळ्या निर्जीव यात्रेकरूंची मला कींव करायची नाहीं. तिला अशा रीतीनं मरण यावं, या दुर्दैवाचंच मला वाईट वाटतं. असं मरण तिला यायला नको होतं. जो कोणी जगन्नाथ असेल त्याला मला विचारायचं आहे कीं या निष्पाप जीवानं तुझा असा काय अपराध केला होता, म्हणून तूं तिला अशी घोर शिक्षा दिलीस ? आणखी कांहीं वर्षं

ती जगली असती, तिनं आपला चिमुकला संसार मांडला असता, आपल्या नवऱ्याच्या आणि मुला-बाळांच्या सहवासांत कांहीं दिवस घालवले असते, जीवनांतल्या मधुर आनंदाचे कांहीं क्षण तिच्या वांट्याला आले असते, तर असं काय मोठंस बिघडलं असतं ? जगांत असे लक्षावधि लोक आहेत कीं त्यांना जीवनापासून अधिक कांहीं अपेक्षा नसते. त्यांना कीर्ति नको असते. पैसा नको असतो. साधुत्वाचा किंवा वीर वृत्तीचा दिमाख त्यांना नको असतो. त्यांना फक्त जीवनांतलीं साधींसुधीं सहजीं मिळणारीं सुखं हवीं असतात आणि या सुखांना सुद्धां ते बिचारे पारखे होतात. हीं लहानसहान क्षुल्लक सुखं सुद्धां त्यांच्यापासून हिरावून घेतलीं जातात. तिनं असं काय केलं होतं, म्हणून तिला असं मरण आलं ? हीं साधींसुधीं सुखं सुद्धां तिच्या वांट्याला आलीं नाहींत. आणि तिनं मरावंच असं विधिलिखित असलं, तर आपल्या प्रेमाच्या खेडे-गांवांत, समुद्राच्या सान्निध्यांत, ताडमाडांच्या सहवासांत आणि आपल्या प्रेमळ माणसांच्या संगतींत तिला कां मरण येऊं नये ! या अशा मरणासाठींच कां ती जन्माला आली होती !

भोंवतालीं प्रेतांचा खच पडला आहे, मृतासाठीं रडणारे त्यांचे आप्त आक्रोश करीत आहेत, थकलीं भागलेलीं निराश पावलं तशींच मार्गक्रमण करीत आहेत, बाजूला कोल्हींकुत्रीं आणि वर घारी गिधाडं घिरट्या घालीत आहेत, अशा भयंकर परिस्थितीत तिला आलेलं मरण योग्य होतं कां? कोण जाणे!

तिचं मृत शरीर मी पुरलं नाहीं. जाळलंहि नाहीं. ती आंत मावेल एवढा खोल खड्डा खणण्याची साधनं माझ्याजवळ नव्हतीं आणि असतीं तरी तेवढी ताकद आतां माझ्या निर्जीव हातांत नव्हती. जाळायचं म्हटलं तर जाळण्यासाठीं लाकडं लागतात आणि लाकडं पैसे देऊन विकत घ्यावीं लागतात. माझ्याजवळ तर फुटकी कवडी देखील नव्हती. तिच्या निर्जीव बाहुपाशांतून मी मुलगी हळूंच सोडवून घेतली. आणि माझ्या बायकोला तशीच रस्त्याच्या कडेला टाकून देऊन मी पुढची वाटचाल करायला लागलों.

कलकत्ता अजून फार दूर होतं. आणि गेल्या कित्येक दिवसांत माझ्या मुलीच्या पोटांत दुधाचा थेंब किंवा धान्याचा कणसुद्धां गेलेला नव्हता. तिला बिचारीला आतां रडवतसुद्धां नव्हतं. गळ्यांतून कसलाहि आवाज काढण्याची शक्ति

तिच्या ठिकाणीं आतां राहिलेली नव्हती. पाण्यावांचून तडफडणाऱ्या मासळीसारखे तिचे ओंठ एकसारखे उघडत आणि मिटत. ओंठांची ही उघडझांप अखंड चालू होती. या चिमुकल्या जल-देवतेनं आपला खुळखुळा मात्र आपल्या मुठींत अगदीं घट्ट धरून ठेवला होता. हळुंहळूं विझत जाणाऱ्या मेणबत्तीसारखी ती माझ्या डोळ्यांदेखत झिजत होती, मरत होती. आणि तिच्यासाठीं मी कांहींहि करीत नव्हतों. मी तरी काय करणार? कांहीं करणंच शक्य नव्हतं. यंत्रासारखीं माझीं पावलं पुढें पुढें पडत होतीं. माझी कंटाळवाणी वाटचाल अखंड चालू होती. माझ्या पुढं, मागं, दोन्हीं बाजूंना, सगळीकडं असंख्य लोक पसरलेले होते. मृत्युयात्रा! चालणाऱ्यांपैकीं प्रत्येकजण निराशेच्या दरींतून जात होता. हे सारे लोक कधींच मेलेले असूनहि आंधळेपणानं चालत होते. प्रत्येकाच्या डोळ्यांत मृत्यूची छाया होती. पण शरीर-यज्ञ अविश्रांत धगधगत होता...मी आकाशाकडे पाहिलं आणि दोन्हीं हात जोडून प्रार्थना केली.–

“देवा, जगन्नाथा! या निष्पाप मुलीकडे पहा. तूं जगाचा निर्माता आहेस. पालनकर्ता पण तूंच आहेस. अन्नदाता! अन्नाचा एक कणसुद्धां तुझ्या

या अमर्याद विश्वांत तुला कुठं सांपडत नाहीं कां?......पहा. तिच्याकडे पहा. आपले सुकलेले ओंठ ती पुनः पुनः मिटते आहे आणि उघडते आहे. उपासमारीच्या या यातनांनीं तिचं कोमल शरीर कणाकणांनीं मरतं आहे...कुणी म्हणतात, मृत्यु सहज आहे, सुंदर आहे. पण हें मरण सहज नाहीं आणि सुंदर तर नाहींच नाहीं. या निष्पाप बाळजीवाचा असा शेवट करणं तुला शोभतं कां? ....शंभु महादेवा! तूं संहारकर्ता आहेस. संहार करणं हें तुझं काम आहे. पण या सुकुमार मुग्ध कळीला जरा उमलूं देण्याची तर वाट पहायची होतीस. या सुंदरतेच्या स्वप्नाला आकार तरी येऊं द्यायचा होतास? तुला एवढी कसली घाई झाली आहे? तूं कळ्यासुद्धां चुरगाळून टाकतोस........समुद्राच्या पृष्ठभागावर उमटलेले बुडबुडे, दूर क्षितिजापाशीं अस्पष्ट दिसणारी होडी—“ अहो, जरा पलीकडे जा ना! मला पाण्यांतून बाहेर यायचं आहे.”—ताड-माडांच्या झांवळ्यांखालीं घेतलेलं पहिलं चुंबन. बाळकळीचा जन्म...या सगळ्यांचा हाच निरर्थक शेवट कां? अन्नदाता, तूं क्रूर आहेस. निष्ठुर आहेस. आंधळा आहेस. तुला दया माया माहित

नाहीं.—"—पण छे ! प्रार्थना काय आणि शिवीगाळ काय, दोन्हींचाहि उपयोग सारखाच. म्हणजे कांहींच नाहीं. अखेरीस बाळकळीहि उमलण्या-पूर्वीच कोमेजली. धुळीस मिळाली. तो चिमुकला जीव निर्जीव झाला. तिच्या त्या अखेरच्या यातना मला अगदीं बघवत नव्हत्या. नुसत्या आठवणीनं सुद्धां अजून अंगावर शहारे येतात. माझ्या या निर्जीव दृष्टिहीन डोळ्यांना विचारा म्हणजे त्यांनीं जें कांहीं पाहिलं, त्याचं ते अबोल वर्णन करतील. ती बिचारी मेली. दुधाच्या एका थेंबासाठीं आक्रोश करीत ती मेली.—पण आक्रोश करण्याचीहि शक्ति तिच्या ठिकाणीं नव्हती.—तिला दूध हवं होतं, पण दूध कांहीं आकाशातून पावसासारखं पडत नाहीं किंवा जमिनींतून झऱ्यासारखं वहात नाहीं. आकाश निष्ठुर आहे. पृथ्वीहि निष्ठुर आहे. आणि हा कठीण निष्ठुर दगडी रस्ता !...

....मरण्याच्या आधीं—चार दोन क्षण आधीं तिनं आपला आवडता खुळखुळा माझ्या हातांत दिला. हा पहा, हाच तो खुळखुळा. माझ्या निर्जीव मुठींत मी तो अगदीं घट्ट धरून ठेवला आहे. ती मेली पण तिची ही आठवण अजून माझ्याजवळ आहे. तिनं तो खुळखुळा माझ्या

हातांत दिला...तें सारं मला अजूनहि चांगलं आठवतं. तिनं इतक्या सहजतेनें तो माझ्या हातांत दिला कीं मला वाटलं—नव्हे, माझी खात्री पटली कीं तिनं मला क्षमा केली आहे, आणि हा खुळखुळा मला बक्षीस देऊन टाकला आहे. दीड दमडीला मिळणारा हा लाकडी खुळखुळा तिनं मरणापूर्वी मला दिला. ती मोठी झाली नाहीं, हा तिचा दोष नाहीं. नाहींतर तिनं आपलं सर्वस्वसुद्धां मला देऊन टाकलं असतं. जें देतां येण्यासारखं होतं, तें तिनं मला दिलं. त्या बिचारीजवळ फक्त एक लाकडी खुळखुळा होता. आणि तो तिनं आपल्या अभागी बापाला दिला. दीड दमडीच्या या खेळण्याची खरीखुरी किंमत तुमच्यापैकीं कुणाला सांगतां येईल काय ? थोरा-मोठ्यांच्या क्षुद्र त्यागाचं महत्व वर्णन करणारे तुम्ही—हा लांकडी खुळखुळा घ्या आणि पुढं कधीकाळीं जें मानवतेचं मंदिर बांधलं जाणार आहे, त्यांत याची जतन करून ठेवा...

आणि शेवटीं—कलकत्ता ! उपासमारीनं प्रत्यहीं मरणारं हें ओसाड शहर. या शहरांत दयामाया नाहीं, प्रीति नाहीं, सौंदर्य नाहीं. हें शहर क्रूर आहे. निष्ठुर आहे. इथं उबारा नाहीं. इथं निवारा

नाहीं. इथं अन्नाचा कणसुध्दां नाहीं........ सिल्दा स्टेशन, शामबझार, बडाबझार, हॅरिसन रोड, झकिरिया स्ट्रीट, बोबझार, सोनागच्ची, न्यू मार्केट, भवानीपूर—कुठें सुद्धां अन्नाचा लवलेश नाहीं. माणसाकडे माणुसकीनं पाहणारे डोळे इथं कुठेंच दिसत नाहींत.

उपासमारीनं खंगलेले, मृतप्राय झालेले आणि मेलेले असंख्य लोक विलासी हॉटेल्ससमोर जागो-जाग पडलेले आहेत. इथं कुत्रीं आणि माणसं अन्नाचा एकादा कण शोधण्यासाठीं एकाच उकिरड्यावर गोळा होतात. शिळ्या अन्नासाठीं इथं कुत्रीं आणि माणसं आपापसांत मारामारी करतात. आणि या साऱ्या दृश्यांकडे तुच्छतेनं बघत एक सुंदर मोटार गाडी विजेच्या वेगानं आणि विजेसारखी चमकून जाते. गाडींतले लोक बाहेरच्या लोकांकडं पाहून हंसत असतात.

धुळींत लोळत पडलेल्या त्या उघड्या नागड्या प्रेतांच्या बरगड्या लोखंडी शृंखलांसारख्या उमटून दिसत आहेत. या शृंखलांत इतके दिवस तरी आत्मा कां अडकून पडला होता ? गरीब बिचारा ! उडून जाऊं दे त्याला. या भयंकर तुरुंगाचे दरवाजे सताड उघडून द्या... तेवढ्यांत आणखी एक

मोटारगाडी विजेसारखी चमकून भोंवतालच्या अंधारांत दिसेनाशी होते.

परंतु शरीरं आत्म्याचा आक्रोश ऐकत नाहीं. ....आया मरत आहेत. त्यांचीं मुलं भिक्षा मागत आहेत. बायको मरते आहे आणि पलीकडेच तिचा नवरा कण्हतो आहे—तेवढ्यांत रिक्षामध्यें बसून एक साहेब जातो. खुरडत तो नवरा रस्त्याच्या मधोमध येतो. रिक्षा थांबते. साहेब चार शिव्या हांसडतो. रिक्षा सुरू होते.— " अग आईग मेलों ! मेलों! "—-त्याच्या पायांवरून रिक्षा जाते...ती पहा, पलीकडे ती तरुण मुलगी आहे. तिचं शरीर अगदीं उघडं नागडं आहे. पण आपल्या नागव्या शरीराची तिला जाणीव नाहीं. ती तरुण आहे. सुंदर आहे. पण तिच्या तारुण्याची आणि सौंदर्याची तिला आतां कदर नाहीं. ती स्त्री आहे, हें सुद्धां आतां ती विसरून गेली आहे. तिला एकच गोष्ट माहीत आहे. तिला भूक लागली आहे. गेल्या कित्येक दिवसांत तिच्या पोटांत अन्नाचा एक कणसुद्धां गेलेला नाहीं. भुकेनं सौंदर्याचा सत्यानाश केला आहे. उपास-मारीनं तारुण्याचा बळी घेतला आहे.

कॉन्सुलेटच्या या पायऱ्यांवर मी केव्हांचा तरी

पडून आहे. किती वेळ झाला कुणास ठाऊक. काळवेळाची जाणीव आतां राहिलेली नाहीं. मी संथ निपचीत पडून आहे. मधून मधून वाताच्या झटक्यांत कांहींतरी बरळतों आहे. कांहीं लोक येतात. माझ्याजवळ क्षणभर उभे राहतात. आश्चर्यानं वासलेल्या डोळ्यांनीं माझ्याकडे बघतात. माझ्यांत आतां बघण्यासारखं काय आहे, तें त्यांचं त्यांनाच ठाऊक. मी तर मरणाच्या दरींतून चाललों आहे. मधेंच माझ्या कानांवर कांहीं अस्पष्ट शब्द येऊन थडकतात—" चलो, चलो ! वह साला काफर है. क्या देख रहे हो ? चलो. आगे बढो. अभी तो बहुतसी लांशे देखना है. "

ते पुढें निघून जातात...काळोख पडतो....

आणखी कांहीं लोक येतात. माझ्याजवळ येऊन उभे राहतात. टॉर्चच्या प्रकाशांत आश्चर्य-चकित नजरेनं माझ्याकडे पाहातात. त्या गर्दींतला कुणीतरी एकजण विचारतो.—

" तूं कोण आहेस ? "

मोठ्या कष्टानं माझे भारावलेले डोळे मी उघडतों आणि हळूंच त्यांना सांगतों,—" भुकेला !"

" साला मुसलमान दिसतो आहे. "

तेहि निघून जातात.

भुकेनं धर्माचाहि मुडदा पाडला आहे !

आतां सगळीकडं काळोख पसरला आहे.

किट्ट अंधार. कुठं प्रकाशाचा एक किरण देखील नाहीं. जरा एवढासुद्धां आवाज नाहीं.

शांतता ! भयाण, गंभीर, सर्वव्यापी शांतता ! स्मशानशांतता !

आणि एकदम देवळांतल्या आणि चर्चमधल्या घंटा जोरजोरानं वाजूं लागतात. त्या मधुर शांत घंटारवानं सारं जग जागं होतं, उल्हसित होतं... अखबार विकणारा पोऱ्या ताज्या बातम्या ओरडत जातो आहे— " तेहरानमधें महात्रयी – नवीन जगाचा जन्म ! "

नवीन जगाचा जन्म ! हर्षानं, आनंदातिरेकानं माझे पेंगुळलेले डोळे क्षणभर उघडतात. आणि मग किती वेळ तरी ते तसेच उघडे राहातात. माझी चेतनाशक्ति क्षणार्धांत आणि क्षणभर जागृत होते.

तेव्हांपासून आश्चर्यानें वासलेले माझे डोळे अजून तसेच उघडे आहेत.

मी कांहीं मोठा मुत्सद्दी नाहीं. तुमचं राजकारण मला समजत नाहीं. सतारीवर रागदारी

वाजविण्यांत धन्यता मानणारा मी एक साधासुधा भावडा मनुष्य आहे. नियम वगैरे मी जाणत नाहीं. त्यांचा अर्थच मला कळत नाहीं. राज्य-कर्त्यांची नीति मला समजत नाहीं. राज्ययंत्रांत भरडल्या जाणाऱ्या मानवतेची हांक मला आजवर कधीं ऐकूं आली नाहीं. मी आज्ञाकार नाहीं आणि आणि आज्ञाधारकहि नाहीं. या भानगडींत मला कांहीं समजत नाहीं. पण माझ्यासारख्या एका यःकश्चित सामान्य माणसालाहि हा जाब विचारण्याचा हक्क आहे.—“ नव्या जगाची भाषा तुम्ही करतां आहांत. या नव्या जगाची निर्मिती तुम्ही करणार आहांत. मग माझ्यासारख्या विनाकारण मरणाऱ्या किंवा मेलेल्या लोकांचा या निर्मितींत कांहींच हातभार नको कां ? ”

मी हा प्रश्न विचारतों आहे, कारण या महात्रयींच्या बैठकींतून कदाचित निर्माण होणार असलेल्या जगांत राहण्याची मला इच्छा आहे. मलाहि फॅसिझमचा मृत्यु हवा आहे. फॅसिझमचा मुडदा याच देहीं याच डोळां पाहण्याची मला उमेद आहे. महायुद्ध आतां पुरे झालं. युद्धाची मला आतां मनस्वी शिसारी आली आहे. जुलूम आणि अन्याय जिथं जिथं असतील, तिथं तिथं

त्यांचा नायनाट करण्याची माझीहि मनीषा आहे... मी कांहीं मोठा राजकारणी पुरुष नव्हे. पण राजकारणांत मला कांहीं समजत नसलं, तरी संगीतांत मला थोडं फार समजतं. उदास गाणं ऐकून सारं जग उदास होतं, निराशेची रडगाणीं ऐकून मानवताहि निराश होते. जो गुलामगिरींत राहतो, तो सर्व जगाला गुलाम करण्यासाठीं झटत असतो. सबंध जगाच्या लोकसंख्येचा विचार केला, तर जगाचा पांचवा हिस्सा हिंदी लोकांचा आहे. प्रत्येक पांचवा मनुष्य हिंदी आहे. उरलेल्या चार जणांना परतंत्र हिंदुस्थानच्या वेदनांची आणि यातनांची कल्पनाहि करतां येणं अशक्य आहे. जो भोगतो, त्यालाच समजतं. जो दुःख सहन करतो, त्यालाच त्या दुःखाचा अनुभव येतो. सतारीची एक तार जरी बदसूर असली, तरी सतारीवर कोणतीहि गत नीटपणं वाजवतां येत नाहीं. ताल चुकतो, ठेका चुकतो, स्वरसमाधि निर्माण होण्यापूर्वींच भंग पावते. एक बदसूर तार सारी सतार बिघडून टाकते. जगांत जोंपर्यंत एक मनुष्य गरीब आहे, तोंपर्यंत जगांतला प्रत्येकजण गरीबच आहे. एकाची दैन्यावस्था ही जगांतली प्रत्येकाचीच

दैन्यावस्था आहे. जगांत जोंपर्यंत एक मनुष्य परतंत्र आहे, तोंपर्यंत सारं जगहि परतंत्रच राहील.

....म्हणून मी तुम्हांला हा प्रश्न विचारतों आहे. या प्रश्नाचा तुम्हांला केव्हांतरी जाब द्यावा लागणार आहे.

मी मेलों आहे, असं तुम्हांला वाटतं? मी मेलों आहे, ही गोष्ट खरी नाहीं. तुम्ही सारे मेले आहांत. मी जिवंत आहे. माझे निर्जीव दृष्टिहीन डोळे तुमच्याकडे सदैव पहात आहेत. आतां या पुढं तुमची पाठ मी कधीहि सोडणार नाहीं. मी हा प्रश्न एकसारखा वारंवार विचारीत राहीन. आणि अखेरीस एक दिवस तुम्हांला माझ्या या प्रश्नाचा जाब द्यावा लागेल. तुम्ही आतां माझ्या तावडींतून सुटणार नाहीं. कुठंही जा. तुमच्या मागोमाग मी येईन. झोंपेंत सुद्धां मी तुमचा पिच्छा सोडणार नाहीं. तुमच्या स्वप्नांतहि माझे निर्जीव, दृष्टिहीन डोळे तुम्हांला सदैव भेडसावीत रहातील. मी तुम्हांला सुखानं जगूं देणार नाहीं. तुमचं जीवन मी तुम्हांला असह्य करून टाकीन. चालतांबोलतांना, खातांपितांना, पावलोपावलीं मी तुमच्यापुढं उभा राहीन आणि प्रत्येक क्षणाला ओरडून [illegible]

जाब विचारीन. अखेरीस तुम्हांला जाब द्यावाच लागेल. जाब देण्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं. तुमचा जाब मिळाल्याशिवाय मी मरणार नाहीं. मी आतां मरून अमर झालों आहे.

तुमच्या नव्या जगांत मला रहायचं आहे, म्हणूनच केवळ मी हा प्रश्न विचारतो आहे, असं नाहीं. माझी अप्सरा अजून रस्त्याच्या कडेला धुळींत लोळत पडली आहे आणि माझ्या हातांत हा लांकडी खुळखुळा आहे...म्हणून याचा जाब तुम्हांला द्यावा लागेल ! त्यावांचून तुमची सुटका नाहीं !